चिंतामणी यशवंत मराठे

# ोनाजी बाळा

तिहासिक तीन अंकी नाटक

मराठी प्रकाशन : ३

किंमत दोन रुपये

प्रकाशक :
शं. ना. अंधूटकर
मराठी प्रकाशन
१२, त्रिभुवन रोड,
मुंबई ४.

★



★

मुखपृष्ठ
चित्रकार: द. ग. गोडसे

★

आवृत्ति १ : १९५४

प्र. के. अत्रे
३६२, वि. प. रस्ता,
गिरगांव, मुंबई ४

श्री

श्री. बाळा कारंजकर यांस

होनाजी या माणसाला त्याच्या आईबापांनीं जन्म दिला असला, तरी होनाजी या कवीला तूं निर्माण केलेंस. त्याच्या कवित्वाकडे दुर्लक्ष करून, प्रसंगीं तें मारून, तूं स्वतःच कवि म्हणून मिरवला असतास. तेवढी हिकमत तुझ्यांत खचित होती. पण दुसऱ्याचा गुण घेण्याचा, मग तो होनाजीसारख्याचा असो कीं फडकऱ्यांसारख्यांचा असो, दिसेल तेथून गुण घण्याचा आणि तो जोगविण्याचा फार मोठा गुण तुझ्यांत होता. म्हणून स्वतःच्या कवित्वाचें टांकसाळी नाणें पाडण्याच्या फंदांत न पडतां तूं होनाजीच्या कवित्वाचा वेल मांडवावर चढविलास. त्यासाठीं त्याची व गुणवतीची युक्तीनें मिळणी करून तूं त्यांच्या वाणीला डंवर आणलास. स्वतःच्या मामुली संसारामागें न लागतां तूं होनाजीच्या कवित्वाचा संसार वाढविलास आणि त्याच्यासह त्यांतच रंगून गेलास.

खरेंच, तुझी आणि होनाजीची मैत्रिकी कसकशी रंगली असेल, याचें चित्र मनोमनीं काढतांना मला जिभेवर मधाचें बोट टेकल्या-सारखा आनंद होतो. त्या मैत्रिकीच्या खेळांत आट्यापाट्यांतील मृदंग्यासारखी खेळणारी तुझीच मूर्ति माझ्या डोळ्यांपुढें नाचत राहते. टपून बसलेल्या दैवानें शेवटीं दावा साधला तो क्षण वगळल्यास तूं होनाजीला आईच्या ममतेनें सांभाळीत होतास, हें पाहून तुझ्या-विषयींचें कौतुक शिगेला लागतें.

होनाजीचें काव्य निसून मी हें नाटक उभें केलें आहे. तें पाह-ण्यास तूं नाहींस. असतास तर सरस तुकड्यावर येतांच माझ्या

पाठविर थाप ठोकली असतीस किंवा सुमार जाग्यांवर अचूक बोट ठेवून तूं माझ्या पेहरणीला झटका दिला असतास. त्याला मी अंतरलों, याचें मला फार दुःख होतें.

शेवटीं एक गोष्ट मुद्दाम सांगावयाची. होनाजीला सोडून तुझें नांव घेणें तुला गैरसंदी वाटलें असतें. म्हणाला असतास, "देवाला झांकून गुरवाला पागोटं बांधण्याचं कारण?" पण तुझें नांव घेण्याचें कारण मी आरंभींच सांगितलें आहे. तुला नांवाजलेलें पाहून होनाजीचें मनही कांसेखालच्या चरवीसारखें फेसाळलें असतें.

शक १८७६ चा गुढीपाडवा,<br>
वस्ती पुणें.<br>
ता. ४-४-१९५४

तुझा आणि होनाजीचा<br>
**चिं. य. मराठे**

# नाटकाविषयीं

गेल्या पिढीपर्यंत महाराष्ट्रांतील स्त्री–पुरुषांच्या तोंडीं असलेली भूपाळी होनाजीनें केव्हां व कशी रचिली असावी या फार दिवस मनांत घोळणाऱ्या विषयावर ‘ श्रीमंतांचें बोलावणें ’ ही गोष्ट ‘ मौज ’ १९४९ च्या दिवाळी अंकांत मी प्रथम लिहिली. ती श्री. विश्राम बेडेकर यांना आवडली आणि त्यांच्याच कृपेनें तिचें रूपांतर श्री. शांताराम–दिग्दर्शित ‘ अमर भुपाळी ’ या चित्र-पटांत १९५१ सालीं झालें. होनाजीचें संकीर्तन येथेंच संपलें असें मला वाटलें. पण नाहीं. पुढच्याच सालीं मुंबई मराठी साहित्य संघाचे कार्यवाह डॉ. अ. ना. भालेराव यांजकडून प्रेष आला कीं मी त्याच विषयावर नाटक लिहावें. कबूल केलें. ‘ सह्याद्रि ’ १९५२ च्या दिवाळी अंकांत मी होनाजीवर आणखी एक गोष्ट लिहिली. आणि नवशिक्या नाटककाराला ज्या असह्य वेणा–वेदना सहन कराव्या लागतात त्या केल्यानंतर यंदा नाटक लिहून झालें. या वेणावेदना सुसह्य करण्याचें काम श्री. द. ग गोडसे, श्री. केशवराव भोळे आणि श्री. वि. द. साठे यांनीं अंशत: केलें. मात्र श्री. साठे नाटक पहाण्यापूर्वीच दिवंगत झाले, ही गोष्ट माझ्या मनाला लागली आहे.

नाटक लिहून झालें खरें, पण तें फार मोठें झालें. सरकारी वेळेच्या बंधनाचे करकचून बांधलेले दोर या वाढत्या अंगवठ्याला रुपूं लागणार असा रंग दिसला. दोर तर तुटत नाहींत, तेव्हां वाढाव्याची छाटाछाट करणें भाग पडलें. हें काम वैद्यकीय हस्त–लाघवानें आणि नाट्यविषयक मर्मज्ञतेनें डॉ. अ. ना. भालेराव यांनीं केलें. नाटकाचा खेळ संक्षेपित स्वरूपांत होत असला, तरी प्रकाशकांनीं पृष्ठसंख्येचें बंधन न घालण्याची कृपा केल्यामुळें नाटक मुळांत लिहिल्याबरहुकुम प्रसिद्ध होत आहे.

या नाटकांतील होनाजी व बाळा या दोनच व्यक्ती ऐतिहासिक आहेत. बाकीच्या व्यक्ती आणि नाटकांतील सर्वच घटना काल्पनिक आहेत. त्यांना कागदोपत्रीं काडीचाही आधार नाहीं.

नाटक लिहवून घेऊन तें रंगभूमीच्या मांडवांत उभें केल्याबद्दल डॉ. अ. ना. भालेराव यांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. तसेंच तें बसविण्याचे परिश्रम घेतल्याबद्दल श्री. म. वि. काळे यांचे, त्यांना हरकामी मदत केल्याबद्दल श्री. भार्गवराम पांगे यांचे आणि नाटकांत काम करणाऱ्या नटवर्गाचे मी या प्रसंगानें आभार मानतों.

चिं. य. मराठे

'होनाजी–बाळा' या नाटकाचा पहिला खेळ मुंबई मराठी साहित्य संघाच्या १९५४ च्या वार्षिक मराठी नाट्योत्सवांत गुरुवार ता.२२ एप्रिल १९५४ रोजीं झाला. त्यावेळीं खालील स्त्री–पुरुषांनीं त्यांत भूमिका केल्या.

| | | |
|---|---|---|
| होनाजी | : | सुरेश हळदणकर |
| बाळा | : | भालचंद्र पेंढारकर |
| गुणवती | : | ललिता मेहता |
| यमुना | : | सुमन मराठे |
| विठाई | : | सरोज पटवर्धन |
| उदाजीराव | : | मा. दत्ताराम |
| मोरशेट | : | दत्तोपंत आंग्रे |
| पुराणिक | : | यशवंत देवधर |
| भिकाजी | : | मनोहर घारपुरे |
| दौलतराव | : | अंधटकर |
| जान्या | : | शंकर घाणेकर |
| काशीराम | : | लक्ष्मण साठे |
| पांडू | : | बापू साठे |
| बापू | : | बल्लाळ |
| निरोप्या | : | आ. दे पाटील |
| भवान्या | : | डेम्बी |
| धोंडी | : | नारकर |

| | | |
|---|---|---|
| दिग्दर्शक | : | म. वि. काळे |
| संगीत दिग्दर्शक | : | हेमंत केदार |
| नृत्य दिग्दर्शक | : | चंद्रकांत हडकर |
| साथ | : | गोविंद पटवर्धन, दामुअण्णा पार्सेकर<br>बाबुराव कुमठेकर |
| नेपथ्य | : | गोडसे |

# होनाजी बाळा

## : १ :

### प्रवेश पहिला

[ पुण्यांतील बावन–खणीच्या जवळपासचा एक रस्ता. पहांटेची वेळ. तरीदेखील अजून एखाद्या माडींतून गाण्या–नाचण्याचे स्वर व आघात तबला–सारंगीच्या साथींत व चाळांच्या रुमझुमींत कानावर येत आहेत.

पुण्यांतील तत्कालीन म्हणजे दुसऱ्या बाजीराव साहेबांच्या ( श्रीमंत हें तत्कालीन रूढ नांव ) अमदानींतील नाणावलेले सराफ व सावकार मोरशेट निफाडकर आणि सरदार भापकरांचा तरुण मुलगा उदाजी गाण्याची खास बैठक आटोपून बाहेर पडले आहेत. एरवीं त्यांच्यापुढें चालणारा मशालजी आणि मागून येणारा खिदमतगार यावेळीं दिसत नाहीं. तथापि त्याची त्यांना फिकीर नाहीं आणि आठवणही नाहीं. ऐकून आलेल्या गाण्याची तारीफ करण्यांत ते रंगले आहेत.

मोरशेट निफाडकर प्रथम गाण्याविषयींचा आपला अभिप्राय सांगून नंतर आपल्या तरुण सहकाऱ्याचा कल अजमावतात. ]

**मोरशेट** : वा ! गायली छान ! रवाळ सोन्यासारखी ! पोरगी चांगली तयार केली यमुनेनं. काय उदाजीराव, झाली कीं नाहीं तबियत—( वळून पाहतात तों उदाजी बरोबर नाहीं. ) आँ ? गेला कुठं उदाजी ? ( मागें पाहात ) कीं खुषीच्या ओढीनं हटला माघारी ! उदाजी, (–आणखी मोठ्यानें ) अरे उदाजीराव !

**उदाजी** : ( लांबून ) आलों, आलों मोरशेट.

**मोरशेट** : ( त्या रोखानें पाहात ) पतंगाची दोरी खेचली वाटतं त्या पोरीनं. ( तो दिसतांच ) अरे, गेला होतास कुठं ?

**उदाजी** : ( घाई-घाईनें येत ) जिथून आपण निघालों तिथं.

**मोरशेट** : म्हणजे ? तिच्या माडीवर ?

**उदाजी** : अहो बावन खणांची माडी अन् सगळे खण सारखे ! चिराकदानांतले आवळे-जावळे दिवेच जसे ! पण कुठें एखादा पोपटाचा पिंजरा, खिडकीवरला मशरूचा पडदा, हंड्याझुंबरांचा बिलोरी दागिना—निदान गेला बाजार रंग-रोगणाचा नूर बघून ठेवावा...

**मोरशेट** : कां रे बाबा, इतकी मिठी बसली कां तिच्या गाण्याची ?

**उदाजी** : गाण्याची ? म्हणजे तिच्या गाण्याकडे माझं लक्ष होतं असं समजून बोलतां वाटतं !

**मोरशेट** : मग आपण गेलों होतों कशासाठीं ?

**उदाजी** : मोरशेट वय झालं तुमचं ! तरीपण तरुणपणाच्या खंदकावरुन आल्हाद घोडा फेकून उतार वयाची रेवण गांठली नाहीं ना तुम्ही ?

**मोरशेट** : अगदीं कोतवालासारखी जबानी घेतोस रे ? पण हें बघ, उतार वयाच्या ओझ्याच्या तट्टावर बसलेल्या माणसाला तरुणपणांतल्या घोडदौडीची वार्ता पुसूं नये.

**उदाजी** : नाहीं पुसत ! तुम्ही यमुनाबाईशीं बोलतांना उभयतांच्या चेहऱ्यावर ओळखीच्या जुन्या-नव्या खुणा उमटत होत्या, त्यावरुन आली कल्पना !

**मोरशेट** : अरे गुलामा ! मग रंभाजीराव समजतात तितका कांहीं दोडा-दुर्दा नाहींस तूं !

**उदाजी** : कसा असेन ? अहो, कळसूत्री बाहुल्यांच्या खेळांत लढाईवर निघालेल्या सरदाराला मिठी मारणारी बाहुली पाहिली कीं, या प्यालेदार अंगरख्याचे बंद छातीला तटूं लागतात. मग तीच बाहुली सजीव पाहिल्यावर—काय सांगू मोरशेट ! तिचे ते खळीला डंवचणारे खव्यासारखे नरम गाल, अलख-पलख निरखून टक लावणारे कबूतरासारखे गरगरीत डोळे, लाल-चुटुक मेंदी-सारखे मिटते-उघडते ओठ-वस्, काळजाला हात घातला तिनं ! वा ! याला म्हणावं लावण्याची बहार !

**मोरशेट** : असं! एकुण तूं रूपसुरतीच्या नक्षीदार करंड्यावर भाळलास, अन् गायकीचा अनमोल गहिना विसरलास! मला वाटलं, तिच्या गायकीची दाणेदार तान, भिंगरीदार फिरत...

**उदाजी** : बोलूं नका मोरशेट, बोलूं नका. नुसता तिच्या मुखड्याचा झुकता डौल नागफणीचा नक्षा उतरील असा मोहरेदार! काय करता गायकीचे गुण! मीठ-मोहऱ्यागत उतरून टाकावे.

**मोरशेट** : समजलों. दोष तुझा नाहीं, तुझ्या नसांतल्या ऊन रक्ताचा आहे. पण लक्षांत ठेव, हिच्या रूपाची बरोबरी करणाऱ्या शंभर भेटतील, गायकीची करणारी एकही भेटणार नाहीं. अन् पोरगी नांव काढील तर गायकींतच.

**उदाजी** : खरंच, काय हो तिचं नांव?

**मोरशेट** : कां? नांवाची कां रे चौकशी? सकाळच्या प्रहरीं कळावंतिणीचं नांव कशाला तोंडीं? देवाचं घे.

**उदाजी** : अहो, कळावंतिणीचीं नांवं झालीं तरी तीं काय देवाविरहित असतात? तिच्या आईचं नांव यमुना, तें घेताच तुम्ही. तसंच तिचं कांहीं गंगा-गोदा. इतकं कशाला? परवां कांहीं बारगिरांनीं कळावंतीण नाचविली, तिचं नांव होतं सावित्री. मग बोला आतां!

**मोरशेट** : कळावंतीण नसेल ती! कसबीण-कोल्हाटीण असेल!

**उदाजी** : कुणी कां असेना—

**मोरशेट** : हां हां, चुकतं तें हेंच. म्हणे कुणी कां असेना! बकालबुणग्यासारख्या हलक्यांच्या जमावांत तुझ्यासारख्या सरदारांनीं आधीं जायचं नव्हे, तो तूं गेलास! आतां उद्यां जाशील त्या ढोलकीच्या तमाशाला! आलाय म्हणे कोणी माणदेशी! हुल्लड उठविली आहे त्यानं! (दबून हलक्या स्वरांत) नाच्या पोऱ्याऐवजीं बायका नाचवितो म्हणे तो!

**उदाजी** : सांगोवांगीचा मामला कशाला? होय, नाचवितो. मला माहीत आहे.

**मोरशेट** : काय म्हणतोस! कशावरून रे?

**उदाजी** : अहो, मीच गेलों होतों.

**मोरशेट** : (स्तंभित स्वरानें) काय?

**उदाजी** : गेलों होतों. अन् स्वच्छ कबूल करायचं म्हणजे तुमच्या त्या डफ-तंबोरीच्या तमाशाहून तो ढोलकीचा रंगच आपल्या पसंतीला उतरला.

**मोरशेट** : ढोलकीचा ?

**उदाजी** : हो हो ढोलकीचा. इतकं हादराथाला काय झालं तुम्हाला ? तमाशा म्हटल्यावर आडपडदा बिलकूल कामाचा नाहीं. सगळा बाजार खुला हवा. नाहींतर तमाशांत अन् दशावतारी आख्यानांत फरक काय राहिला !

**मोरशेट** : हं, मग तूं पक्का पुढचा गांठलास ! तरीच मला रंभाजीरावांनीं सांगितलं बरं कां —

**उदाजी** : काय सांगितलं ?

**मोरशेट** : कीं पोरगा आला आहे उमेदींत. हलक्या लोकांच्या संगतींत वाहावेल एखादा. शोकच करायचा तर निदान संभावित कळावंतिणीकडे तरी घेऊन जा.

**उदाजी** : असं सांगितलं दाजींनीं ? म्हणून मला बरोबर घेऊन आलांत होय आज ! छान ! बायकोही बापानंच बघून द्यायची, अन् कळावंतिणीचं वळणही बापानंच बांधून द्यायचं.

**मोरशेट** : मग काय चुकलं रे यांत ? हे शोक तुमच्यासारख्या सरदारांनीं नाहीं करायचे, तर काय पखाल वाहणाऱ्या भिस्त्यांनीं ?

**उदाजी** : मग ठरलं मोरशेट.

**मोरशेट** : काय रे ?

**उदाजी** : वडिलांनीं ओढून दिलेल्या रेघेबरहुकुम चालायचं.

**मोरशेट** : छान झाल. उतार वयामुळें रंभाजीरावांना सरदारीचं ओझं झालंय ! तूं त्यांच्या वडील कुटुंबाचा वडील मुलगा. समजुतदारपणानं सगळाच कारभार अंगावर घेतलास, तर हलकं वाटेल त्यांना !

**उदाजी** : पण मला जड वाटेल तें ! उद्यां ते म्हणतील मुलुखगिरीवर जा म्हणून !

**मोरशेट** : मग नको जायला ? सरदारीची ऐट मिरवायला हवी तर तलवारीची मूठही पेलायला हवी ! बाकी सध्या मुलुखगिरीची मूठही झांकल्यापैकींच म्हणा ! गारपिरावर जाऊन डेरेदाखल व्हायचं, अन् पर्वतीच्या बागेवरून पुनः शहरांत मुक्कामाला यायचं !

**उदाजी** : तिथें श्रीमंतांकडून निरोपाचे विडे घ्यायचे, अन् बावनखणींत येऊन कळावंतिणींच्या मजलसींत सामील व्हायचं !

**मोरशेट :** ही रेघ ओढून दिली काय वडिलांनीं ? ( गंभीरपणानें ) उदाजी, तुमच्या शिपाइगिरीला कंपूच्या पलटणी केव्हां धूळ चारतील याचा नेम नाहीं, इकडे कांहीं लक्ष आहे कां ?

**उदाजी :** ( बेफिकीरीनें ) चारतील तेव्हां चारतील ! कळावंतिणीच्या नादांत या गोष्टीची वाटाघाट कशाला ? तूर्त वडिलांनीं मला ज्यासाठीं तुमच्या ओट्यांत घातलं, तें न्या शेवटाला म्हणजे झालं.

**मोरशेट :** म्हणजे काय करूं म्हणतोस ?

**उदाजी :** आतां अगदीं उघडच सांगायला हवं ? अहो, जिनं माझ्या पतंगाचा दोर खेंचला, त्या कळावंतिणीची अन् माझी—

**मोरशेट :** हां, सबूरीनं घे. हलवायाच्या दुकानांतल्या बत्ताशावारी मिळणारी कळावंतीण नव्हे ती ! घरंदाज आहे, अब्रूदार आहे, तालेवारीचा हिशेब करणारी आहे—

**उदाजी :** ( आढ्यतेनें ) ती ? अन् मी काय कमी आहें ! सरदार आहें, दौलतदार आहें, तालेवारीचा शिकंदर आहें.

**मोरशेट :** म्हणून कुठं उतावळेपणाचं बाशिंग बांधून भागतं कां ? रंभाजीरावांच्या कानावर घालतों, यमुनेचा अंदाज घेतों—

**उदाजी :** काय सांगतां मोरशेट ! जात-कुळी बघून सोयरीक जमवल्यागत अवघड गोष्टी !

**मोरशेट :** मग काय तुला तांदुळज्याच्या भाजीगत सवघड वाटतात होय ? जाऊन ये बरं उद्यां तिच्या माडीवर ! म्हणजे कळेल तुझ्या कंगणीदार पगडीचे पेंच किती पिळदार आहेत ते !

**उदाजी :** उगीच कां घालतां इरेला मोरशेट ! तिच्यापायीं सरदारीची अवघी दौलत नी इभ्रत—

**मोरशेट :** पुनः अेकदां सबूर ! रंभाजीराव आहेत तोंवर सरदारीची दौलत नी इभ्रत त्यांची. त्यांच्या इतल्ल्यानं गोष्टी घडायला पाहिजेत. लक्षांत ठेव, शोक करायचा, पण रीत सोडायची नाहीं. अरे ? ( कान देऊन ) बोलतां बोलतां आपण रामेश्वरापर्यंत आलों वाटतं. ती काय काकडारती ऐकूं येते आहे.

**उदाजी :** ( त्यांच्यासारखाच कान देऊन ) हो, येते आहे खरीच.

**मोरशेट :** मग चल काकडारतीला. कळावंतिणीचा संसर्ग अनायासें धुऊन निघेल. धुळवडीनंतर अंघोळ हवी.

**उदाजी :** तुमच्याबरोबर आलों म्हणून सुटका नाहीं. पण तिची गोड गायकी, नुकतीच तोंडभर नांवाजलीत अन् त्यावर आतां काकडारतीची झांगड ऐकायची म्हणतां ? ऐका बुवा. खडीसाखरेवर सुंठवडा !

**मोरशेट :** अरे, देवापुढं रेडा रेकला तरी हसूं नये म्हणतात, अन् तूं खुशाल काकडारतीची हेटाळणी करतोस ? उदाजी, नेहमीं एक गोष्ट लक्षांत ठेव. जिथल्या गोष्टी तिथं. कळावंतिणीच्या कपाळभर मळवटाला घरच्या बायकोच्या पुतळीभर कुंकवाची सर नाहीं. मग ती गुणवतीसारखी ठसकदार कळावंतीण असली म्हणून काय झालं.

**उदाजी :** कुणासारखी ?

**मोरशेट :** अरे ती यमुनेची पोरगी, गुणवती !

**उदाजी :** गुणवती नांव काय तिचं ? ओहोहोहो. नांव देखील मोठं ठसकदार आहे बुवा !

**मोरशेट :** असेल. पण तें पायांतल्या जोड्याबरोबर बाहेरच ठेवायचं. लक्षांत आहे ना ? देवळांत जातों आहों आपण ! जिथल्या गोष्टी तिथें.

[ पडदा ]

## प्रवेश दुसरा

[ देवळांत काकडारती चालली आहे. जमलेल्या मंडळींत होनाजी आणि त्याची आई विठाबाई काकडारतीसाठीं आलेलीं आहेत. मोरशेट व उदाजी दाखल होतात तेव्हां काकडारती संपत आलेली आहे. याचवेळीं घाईघाईनें आलेला बाळा कारंजकर घोळक्यांत सामील होतो. उदाजी अजूनही गुणवतीच्या नांवांतच गुंगल्यामुळें आरतीच्या गोंगाटांतही मोरशेटजींची बाही ओढतो. ]

**उदाजी :** म्हणजे रूपवतीचं नांव गुणवती असंच कां म्हणा ना !

**मोरशेट :** ( देवाकडे बोट दाखवीत ) शूः शूः शूः ( दोन्ही कानाला हातानें स्पर्श करून नमस्कार करून ) तूर्त नांवाचीच !

[ काकडारती संपते. पुजारी बटु प्रत्येकापुढें काकडा फिरवीत उदाजी व मोरशेटजीपुढें येतो. त्या प्रकाशांत त्यांचे चेहेरे पाहून पुराणिकबुवा लगबगीनें पुढें येतात. ]

**पुराणिक** : ( उदाजीस ) आँ ? पहांटेचे इकडे कोणीकडे आज ?

**उदाजी** : ( मोरशेटजींकडे बोट दाखवून ) यांच्याबरोबर आला योग.

[ पण पुराणिकबुवांना मोरशेटजी कोण हें माहीत नसल्यामुळें ते कोण असें हाताच्या खुणेनेंच विचारतात. ]

**उदाजी** : ( मोरशेटजींकडे पाहात ) हे ना ? माहींत नाहींत तुम्हांला ? हे मोरशेट निफाडकर. सराफ, जवाहिरे, सावकार. मोठी मातबर आसामी आहे, पुराणिकबुवा. देवघेवीचा व्यवहार थेट श्रीमंतांपावेतों.

**मोरशेट** : हो आहे थोडाफार.

**पुराणिक** : आपण सरदार, हे सावकार. समसमां संयोग झाला म्हणायचा. पण यांच्याबरोबर यावेळीं कसे ?

[ पुराणिकबुवांचा प्रश्न नाजुक, तसाच आकस्मिक. त्याचें उत्तर चटकन् देतां येण्याजोगें नव्हेंत. त्यामुळें उदाजी घोंटाळून मोरशेटजींकडे पाहूं लागतो. उदाजीची अडचण ओळखून मोरशेटजी सफाईनें बोलतो. ]

**मोरशेट** : माझी पहांटची काकडारती कधीं चुकत नाहीं. पण ती होते शनिवारांतल्या राममंदिरांत. आज हे पहाटेच घोडीं फेरावयास बाहेर पडले वाटतं. अवचित भेटले. खालीं उतरले. बोलत बोलत आलों शुक्रवारांत. म्हटलं आजची काकडारती इथें. आपली नी उदाजीरावांची...

**पुराणिक** : नुसती ओळखच नव्हे, यांच्याच घरीं माझं पुराण चालू आहे चातुर्मास्यांत. यांचे वडील दाजीसाहेब, यांच्या मातुश्री—मोठीं श्रद्धाळु माणसं.

**मोरशेट** : आमचाही घरोबा आहे, पुराणिकबुवा. देवघेव अन् स्नेहसंबंध. जाणं-येणं फार. पण आपलं पुराण चालूं असेल ही कल्पना मात्र नव्हती. अन् उदाजी-रावहि तसं कांहीं बोलले नाहींत.

**उदाजी** : कसा बोलेन ? तुम्हांला पुराणाचा शोक आहे कीं काय ?

**मोरशेट** : वयपरत्वें शोक !

**उदाजी :** काय गम्मत पहा पुराणिकबुवा. यांचा माझ्यावर वडिलांसारखा लोभ अन् मी देखील यांना दाजीइतकेच मानतों. पण काकडारतीसारखा यांना पुराणाचाही शोक आहे हें आज मला कळलं.

**मोरशेट :** होतं असं. दोन डोळे शेजारीं अन् भेट नाहीं संसारीं. बरं, येतों पुराणिकबुवा.

[ परस्परांचे नमस्कार होऊन उदाजी व मोरशेट जातात. पुराणिकबुवा त्यांच्याकडे कांहीं वेळ पाहात राहतात आणि म्हणतात "मोठीं माणसं!"

विठाबाई ते दोघेजण जाण्याची वाट पाहात होती. ती आतां पुराणिकबुवांशीं बोलण्यासाठीं पुढें येते. ]

**विठाबाई :** ( पुराणिकबुवांच्या "मोठीं माणसं" या उद्गाराला अनुलक्षून ) सगळींच कुठचीं असायला मोठीं. आमच्यासारखीं कांहीं लहानही असतात. लक्ष असावं, पुराणिकबुवा.

**पुराणिक :** ( निहाळून ) कोण ? विठाबाईच कां ? ( विठाबाई होकार देते ) एकदम ओळखलं नाहीं. फार दिवस झाले. कां हो ? कधीं बरं !

**विठाबाई :** गुदस्तां याच दिवसांतली गोष्ट. सासवडाहून आल्ये होत्ये मी. पण आतां आम्ही इथेंच आलों राहायला. मी अन् ( जवळच असलेल्या होनाची बाही ओढून ) हा माझा मुलगा होना. ( होनाला ) मी सांगत होतें ना होना, ते हे पुराणिकबुवा, बरं का ! ( होना नमस्कार करतो. )

**पुराणिक :** ( होनाकडे पाहात ) चांगला जाणता आहे कीं तुमचा मुलगा. मग कां होतां माहेरीं, इथें घरदार असतां ?

**विठाबाई :** सांगितलं ना ! घरदार आहे, थोरले दोन दीरही आहेत. पण त्यांचा छंद माहीत असेलच तुम्हांला ?

**पुराणिक :** बाळा-बहिरू ना ? वा ! श्रीमंतांच्या दरबारीं प्रतिष्ठा मिळवून आहेत ते. आपला विषय नव्हे तो. पण ऐकलं लोक बोलतात तें.

**विठाबाई :** खरं आहे पुराणिकबुवा. तुमच्यासारखाच माझाहि विषय नव्हे तो. तिटकारा आहे मला. त्याच वर्दळीला कंटाळून माहेरीं राहिले होते. म्हटलं मुलाला तरी त्याचं वारं नको.

**पुराणिक** : या योगायोगाच्या गोष्टी असतात विठाबाई. एखाद्याला नाद लागायचा म्हणजे हटकून लागतो. अन् नाहीं म्हणजे नाहीं. बाकी याला तमाशापासून दूर ठेवलात हें बरं केलंत !

**विठाबाई** : अहो, आपला वडिलोपार्जित गवळ्याचा धंदा सोडून तमासगिरीचे छंद-फंद बरे दिसतात का सांगा बरं. निदान संभावितपणाला तरी !

**पुराणिक** : छे हो, तमासगिरी अन् संभावितपणा यांचं सूतगोतच मुळीं सुतक-सोहेरासारखं !

**विठाबाई** : अस्सं ! माझे सासरे काय कवनं करीत नव्हते ? लावण्या-भुपाळ्या त्यांनीं रचल्या, म्हटल्याही. पण हे तमासगिरीचे छंद-फंद नाहीं सुचले त्यांना.

**पुराणिक** : कोण सातापा ना ? लहानपणीं पाहिलेले आठवतात. येत असत आमच्या वडिलांकडे. वेदांताची चांगली माहिती करून घेतली होती त्यांनीं.

**विठाबाई** : त्यांची लायकी कुणीकडे, पुराणिकबुवा. शांतलिंग दैवताच्या रूपानं ती अजून संगमावर साक्षीला आहे. आतां सांगा बरं. त्यांच्याच मुलांनीं हे तमाशाचे ढंग करावे का ! बाकी कांही झालं तरी ते माझे दीर आहेत म्हणा. पण मला नाहीं रुचत हें. म्हणून मी आपली दूर राहिलें सासवडाला, होनाला घेऊन.

**पुराणिक** : चांगलं केलंत विठाबाई.

**विठाबाई** : केलं ना ? अन् सासवडाला शास्त्रीबुवांची संगत लाभली होती होनाला. रंगून गेला होता तिथें. आमच्या सासऱ्याचं अन् तुमच्या वडिलांचं जसं, तसं शास्त्रीबुवांशीं होनाचं मन मिळालं होतं.

**पुराणिक** : म्हणजे यालाही आजोबांसारखाच आहे कां नाद ? कायरे होना, तूं देखील कवी आहेस वाटतं !

**होना** : मी कशाचा कवी, पुराणिकबुवा. शास्त्रीबुवांच्या संगतीनं चार अक्षरं तोंडांतून निघालीं इतकंच. ते भागवताचं निरूपण करीत—

**पुराणिक** : वा ! सांगणारा रसाळ भेटल्यावर भागवताची गोडी काय विचारावी महाराज !

**विठाबाई** : तीच गोडी यानं एका कवनांत उतरून दिली, अन् शास्त्रीबुवांनीं ऐकून नावाजणी केली. त्याचवेळीं ते म्हणाले कीं हा कांही गुरं वळणारा गोवारी नाहीं, कवी आहे.

**पुराणिक** : कोणतं रे कवन ? म्हण पाहूं.

**विठाबाई** : म्हणेल पुराणिकबुवा. त्यासाठींच आपल्यासारख्यांची संगत हवी आहे त्याला. इथं आल्यापासनं पाण्याविरळ्या माशागत झाला आहे तो. घ्या त्याला आपल्या छायेखालीं अन् सांगा चार अक्षरं.

**पुराणिक** : अहो न सांगायला काय झालं विठाबाई. विद्यादानासारखं पुण्य नाहीं, त्यांतून होनासारखा अनुकूल मनाचा विद्यार्थी भेटल्यावर सांगणारालाही उमेद कां न वाटावी ? येऊं द्या त्याला. सांगेन मला जमेल तसं.

**विठाबाई** : उपकार झाले पुराणिकबुवा. आल्यासारखं एवढं जातें ठेवून.

**पुराणिक** : ठेवून तें काय जाणार आहां ?

**विठाबाई** : गवळ्याच्या घरीं दुसरं काय असायचं ! मी आणलाय थोडा खवा, तुमच्यासाठीं !

**पुराणिक** : दक्षिणा म्हणून कीं काय ? कीं मोबदला म्हणून ?

**विठाबाई** : दक्षिणा कसची अन् मोबदला तरी कसचा ! देवापुढें नारळ नाहीं कां ठेवीत, त्यासारखं हें ! कुठें ठेवूं ?

**पुराणिक** : इथें कुठें ठेवणार ? मागें माझ्या बिऱ्हाडींच चला.

**विठाबाई** : ( जातांना होनाकडे वळून ) होना, आल्ये रे मी ?

[ विठाबाई व पुराणिकबुवा जातात. ही संधी साधून आतांपर्यंत लांब उभा राहून टेहळीत असलेला बाळा कारंजकर होनाला हांक मारतो. हांक ऐकून होना इकडे तिकडे पाहूं लागतो. तेव्हां हंसत त्याच्या मागें येऊन आणि त्याच्या खांद्यावर सलगीचा हात टाकून— ]

**बाळा** : अरे, मी हांक मारली. असा टकटका पाहतोस काय?

**होना** : कोण बाळा ? अन् तूं कसा रे इथें ?

**बाळा** : कसा म्हणजे ? तुझ्या घरीं यायची बंदी झाली म्हणून देवळांतही ?

**होना** : तसं नव्हे रे ! सकाळच्या प्रहरीं बरा आलास देवळांत !

**बाळा** : काकडारतीला ! तूं जसा आलास तसा मी. काय रे ! सासवडाला शास्त्रीबुवा अन् इथें पुराणिकबुवा ! तिथें रुजलं, तें इथें उमटून बहरणार असा रंग दिसतोय गड्या !

**होना** : ऐकलंस वाटतं तूं आईचं बोलणं ?

**बाळा** : तर ! आतां आमच्या वांट्याला कांहीं !

**होना** : काय ?

**बाळा** : दुसरं काय ? गवळ्याच्या घरीं खवा, तसं कवीच्या घरीं काय ? ( टाळी वाजवून हंसत ) अरे, कवनाचा मेवा !

**होना** : जें घरीं, तेंच देऊळीं ! पुनः पुनः तेंच. बाळा, आईची जशी माहीत आहे ना तुला ?

**बाळा** : माहीत आहे रे ! पण ती घरीं ! दारच्या चहूं वाटा तर मोकळ्या आहेत !

**होना** : ते जमावं कसं ? त्यांतून तुला तमाशाचा डाग लागलेला, अन् आईला तर त्या विषयाचा तिटकारा !

**बाळा** : असूं दे र ! तुझ्या आईचा तिटकारा जायचा नाहीं, अन् माझा डाग निघायचा नाहीं. हळदीच्या डागासारखा आहे तो. पुढें काय करणार तें बोल. मीं तर संच जमवून बसलों अन् तमाशाही उभा करून पाहिला,—पण शाहीराच्या मेढीवांचून तमाशाचा मांडव उभा राहात नाहीं गड्या !

**होना** : तें खरं रे ! पण डोंगरचे आवळे अन् समुद्राचं मीठ, मेळ बसायचा कसा ?

**बाळा** : बसेल रे ! खरं सांगूं ? दुखणं रेंगाळलं अन् अंग आंबलं, अशी गत झाली आहे. कंटाळून गेलेल्या फडकऱ्यांना तुझी चाहूल सुनावून चुचकारतो आहे, इतकंच !

**होना** : बाळा, कां गळी पडतोस माझ्या ? जामायचं नाहीं हें !

**बाळा** : तुझ्यावांचून खोटी आहे बघ. कांहीं कर, नाहीं म्हणूं नकोस.

**होना** : माझा नाद सोड कसा ! नाहीं जमायचं !

**बाळा** : ( होनाच्या निरुपायाइतकाच स्वतःचा निश्चय ठाम करीत ) नाहीं ? नाहीं ? ( होना निश्चित नकार देत असतां ) नाहीं ? मग सकाळच्या प्रहरीं देवाच्या साक्षींत सांगतों, जमलंच पाहिजे. ( तरी देखील होना नकार देतो. ) जमलंच पाहिजे.

**होना** : तूं सांग देवाच्या साक्षीनं, मला कां गोंवतोस ! कांहीं झालं तरी तुझ्या स्नेहाहून मला आई अधिक आहे. मी तिला दुखविणार नाहीं.

**बाळा** : अरे, दुखव कोण म्हणतो दळभद्र्यासारखं ! पण कांटा तर निघावा अन् डोळ्यांत पाणी तर येऊं नये...

**होना** : अं हं ! बाळा, ही कारागिरी मला नाहीं साधायची.

**बाळा** : कां नाहीं साधायची ? अरे, सुईच्या नेढ्यांत दोरा ओवून देण्याचं काम तुझं, अन् ठसाठसा टांके मारून घोळदार अंगरखा बनवायचं काम माझं ! न साधण्याजोगं अन् आईला दुखविण्याजोगं आहे काय यांत ? असं पाहा, कवनांची पेर करायला आईची मोकळीक आहे. इतकंच नव्हे, तर कवनांचा मळा पिकवायला पुराणिकबुवांसारखा माळीहि तिनंच जोडून दिला. आतां उरलं काम, त्या मळ्यांतलं माळवं दुरडींत भरायचं !

**होना** : तमाशाच्या !

**बाळा** : पण तें मी तुला सांगत नाहीं. मोट हांकतो, तो काय धांवेंतल्या पाण्याबरोबर धांवत जातो ? ( आपलें म्हणणें त्याला पटत आहे असें पाहून अधिक धिटाईनें ) मग उगाच आईची धास्ती कां खातोस ?

[ अधिक सलगी करीत बाळानें वरील प्रश्न विचारण्यापूर्वी एक क्षणभर विठाबाई परत आलेली आहे. होनाशीं कोणी बोलत आहे हें पाहून ती प्रथम दूर राहते; पण बाळाचा ओळखीचा आवाज ऐकून विशेषतः त्याचा प्रश्न कानीं पडतांच ती पुढें येते. ]

**विठाबाई** : असं काय ? ( होना व बाळा दोघेही चपापतात. बाळा तर अंग चोरीत, जीभ चावीत तात्काळ होनापासून दूर होतो. ) कोण रे तूं ? बाळ्या, तुझा……

**बाळा** : हां हां हां विठाबाई, मुडदा गाडणार माझा. गाडा खुशाल, पण इथें नको. या देवळांत मुडदा पडण्याइतकं पुण्य माझ्या गांठीं कुठून असणार ? मग विनाकारण तुमच्या तोंडीं अभद्र कशाला ? सकाळच्या रामप्रहरीं। रामनाम घोळावं जिभेवरी !

**विठाबाई** : अहाहाहा ! रावणाच्या तोंडावर रामाचा मुखवटा ! मानभावी मेला ! घरीं बंदी केली तर होनाच्या मागें लागून इथें आलास काय ?

**बाळा** : होनाच्या मागें लागून ? छे छे ! देवाच्या–विठाबाई, देवाच्या ! नित्य नेमानं काकडारतीला येत असतों मी ? राहवत नाहीं मला ! कारण, राम-नामाचा सुगंध। भक्त–भ्रमर झाले धुंद। तोच माझ्या जिवाचा छंद।

**विठाबाई** : आतां राम-नामाचा छंद लागला काय तुला ? मुतक्या, तुझा छंद तमाशाचा ! डफडं पिटतां पिटतां—

**बाळा** : तडकलं विठाबाई, भिरकावून दिलं तें! थेट रामजोशीबावासारखं झालं माझं. या उपर मुखीं राम-नामाची गोळी। अन् कानीं हरिकीर्तनाची भिकबाळी। संगमनेरचे फडीबुवा! आले आहेत इथें. काल रात्रींच कथा ऐकली त्यांची. अहाहा, बुवांची वाणी अशी रसाळ अशी रसाळ, जसा कांहीं चाललाय गंगेचा खळाळ!

**विठाबाई** : तोंड बघा मेल्याचं? उंटावरची नौबद झडतेय जशी. कथा ऐकतोय! देव देवळांत अन् नायटे गांवांत. जन्माची आदत मेल्यावांचून सुटेत कां?

**बाळा** : कां नाहीं सुटत? अजामीळासारखा बदफैली रामनामाच्या होडक्यांत बसून पैलथडी गांठतो. अन् पिंगळेसारखी कळावंतीण...

**विठाबाई** : मेल्याच्या तोंडीं दाखले तरी पाहा कुणाचे? अन् हें ऐकत होतास होना तूं?

**बाळा** : हे दाखले त्यानंच मला सांगितले.

**होना** : (बाळाची ही धादांत दडपेगिरी निषेधीत) कुणी मी?

**बाळा** : (मसलत अंगाशीं आली तरी न डगतां) अरे, तूं नाहीं, दुसऱ्या कोणी! बरं ते दाखले या सोडून–वाटमारी करणारा नामेदव! अशा योग्यतेला पोचला कीं त्याच्या परवानगींवांचून रखमाईला भेटायची चोरी झाली विठोबाला. तात्पर्य, देवाच्या दरबारीं जंगलमें मंगल! देव दिसावा म्हणून मी अन्नपाणी वर्ज करून बसलों, तर तो दीनदयाळ माझ्या तोंडीं घास घालायला नाहीं कां येणार?

**विठाबाई** : कोण देव? येईल. येईल तुझ्या तमाशांत नाचायला.

**बाळा** : विठाबाई, फार टाकून बोलतां मला. तुम्ही त्या दिवशीं माझी खरडून साल काढली, आठवतं कां? तधींपासून मनच घेई ना, वीट आला तमाशाचा. आतां मी रोज देवापुढें नाक घांसतो अन् म्हणतों (हात जोडून) देवा रामेश्वरा, आतांपर्यंत झालं तें झालं. निदान यापुढचे दिवस होनाच्या संगतींत...

**विठाबाई** : होनाच्या संगतींत? नको रे बाबा. मुलखाचा फटिंग तूं. तुझ्यासारखं होनानं अजून डोक्याला नाहीं गुंडाळलं. (जणूं त्याचा संसर्ग बाधेल या धास्तीनें) चल, होना.

**बाळा** : (विठाबाईचें म्हणणें सर्वस्वी मान्य करीत) होना, जा बाबा. मलाही तुझ्यासारखी आई असती......

**विठाबाई** : तर तुझे हे फंद बघून घर टाकून गेली असती. तोंड पाहिलं नसतं तुझं.

**बाळा** : ( आपल्या नम्रतेचा कांहींच उपयोग न झालेला पाहून थोड्या प्रांजल-पणानें ) आतां माझा तमाशा सुटला अन् घोळ मिटला ही गोष्ट अलाहिदा. पण मी म्हणतों इतकं काय वाईट आहे हो त्यांत ?

**विठाबाई** : कशांत ? तमाशांत ?

**बाळा** : हो, तमाशांत. अन् वाईटच आहे असं घटकाभर धरून चाला. मग लोकांची तमाशावर टोळांसारखी धाड पडते तेंही वाईटच. सरकार–दरबारीं तमाशाची बूज होते तेंही वाईटच. मग चांगलं कुठें शोधायचं ती तसूभर जागा तरी दाखवा कीं मला ?

**विठाबाई** : तुला ? देवापुढें नवसाचं बकरं मारलं तर त्याचं अधोड डफावर कसं चढेल, तें बघणार तूं.

**बाळा** : अहो, डफावर नाहीं चढलं तर पायांतल्या जोड्यावर तरी चढणार. उद्यां होनाचीं कवनें तमाशांत नाहीं म्हटलीं, तरी देवापुढें म्हणायला कांहीं हरकत आहे कां ?

**विठाबाई** : तूं लागलास साखरेच्या पाकांत तीळ घोळवायला. लागावं कोणी तुझ्या तोंडीं ?

**पुराणिक** : ( आंतून आल्यानंतर विठाबाईचे शब्द ऐकून ) कोणाच्या तोंडीं ?

**विठाबाई** : अहो, हा बाळा शिंपी ! आहे कां ओळखीचा ?

**पुराणिक** : त्याची ओळख नाहीं कोणाला ?

**विठाबाई** : कापडावर सुई ठरेल, पण याच्या तोंडीं शब्द ठरत नाहीं. बाप-दाद्यांपासून चालत आलेला शिंप्याचा धंदा. पण त्याला दिली सोडचिठ्ठी, अन् तमाशाला घालून बसलाय मिठी.

**बाळा** : असं नका बोलूं विठाबाई. आतां आपला शिंप्याचा धंदा बरा, आपण बरे. तेल्याच्या बैलाला सुताची तफावत खपत नाहीं, तसं. विचारा हवं तर ! पुराणिकबुवाच आहेत साक्षीला !

**पुराणिक** : माझी बंडी हातीं येईल तेव्हां.

**विठाबाई** : येते आहे ! कशाला विसंबून रहातां त्याच्यावर !

**पुराणिक** : अहो, नको नको म्हणत होतों तर दोन गज बनात घेऊन गेला. अन् देतो देतो म्हणतो आहे कधींपासनं तर आज तोंड दाखवायला आला.

**बाळा** : सुबक कामाला वेळ अवेळ लागणारच पुराणिकबुवा. पण देतों, मगजीची देतों, गोंडेदार बनवून देतों.

**पुराणिक** : अरे, कशाला ती मगजी, अन् ते गोंडे तरी कशाला ? निर्वाहापुरतें अन्न-आच्छादन ! अंगांत घालायला असलं म्हणजे झालं.

**बाळा** : असं कसं होईल ? लाख्या बनातीला मगजीवांचून शोभा नाहीं, अन् गोंड्यावांचून डौल नाहीं.

**पुराणिक** : सांगितलं ना ? मला नको ती शोभा, अन् तो डौलही नको.

**बाळा** : तुम्हांला नको असेल-पण हवा सरदार भापकारांच्या इतमामाला ! त्यांचे पुराणिक ना तुम्ही ? मग ! तुमच्या अंगांतली बंडी पाहून माझं नांव निघालं पाहिजे. कोणी शिवली ? तर शिंप्यांचा उमराव बाळा कारंजकरानं.

**विठाबाई** : काय लागतां याच्या नादीं ! मुलखाचा बोलभांड हा !- बरं, येतें पुराणिकबुवा मी. मग होनाचं घ्या मनावर.

**पुराणिक** आहे लक्षांत, विषय तर चांगल्या मुहुर्तावर काढलांत. आज आहे कोजागरी पोर्णिमा. होना, ये आज. शारदीय चांदण्यांत कृष्णानं गोपींबरोबर रासक्रीडा केली, तो कथाभाग सांगतों.

**विठाबाई** : कोजागरी पौर्णिमा कां आज ? बरी आठवण दिलीत. चल, होना. धारा काढायच्या आहेत अजून.

[ होना पुराणिकांना नमस्कार करून निघतो. ]

**बाळा** : चाललास होना ?

**विठाबाई** : ( एकदम मागें वळून ) हो चालला. कां ? तुझ्यासारखा खरारा करीत अन् नगारा वाजवीत गांवभर फिरत नाहीं तो.

**बाळा** : विठाबाई, ( पण ती बाळाचें म्हणणें ऐकण्यासाठीं थांबत नाहीं. ती निघून गेल्यानंतर त्यांच्याकडे पाहात. ) बाई फार तिखट. अशी जपते, अशी जपते पोराला, कांहीं पुसूं नका. एवढा जाणता झाला तरी नजरेच्या बिरड्यांतून सोडायला तयार नाहीं अजून.

**पुराणिक** : साहजिक आहे बाळा. विधवेसी एक सुत । अहर्निशीं तेथें चित्त ! तसं आहे विठाबाईचं.

**बाळा** : किती दिवस ! लोणी ताकावेगळं झालं नाहीं तोंवर. काय हो पुराणिकबुवा, ठरलं म्हणतां होनाचं ?

**पुराणिक** : अरे, ठरायचं काय त्यांत ! त्याला कांहीं भारत-भागवतांतल्या कथा ऐकायच्या आहेत. ऐकेल. यथामति यथापाठं, तथा विद्या फलिष्यति । जशी ज्याची बुद्धी, तशी त्याची विद्या.

**बाळा** : मग त्याच्यासारखंच मी तुमचं भारत-भागवत ऐकलं, तर मलाहि कवनं करतां येतील कां हो ?

**पुराणिक** : अरे न यायला काय झालं ! टांकसाळी नाणं तें. कवनं करणं तसं कांहीं अवघड नाहीं. चार घरची मधुकरी आणून एका थाळींत जेवण्यासारखं आहे तें.

**बाळा** : तसं काय उपयोगाचं. तें डौरी-गोंधळी देखील करतात. मला हवं आपल्या शिष्याचं, आपल्या हातानं रांधलेलं.

**पुराणिक** : हां, मग त्यासाठीं कष्ट केले पाहिजेत. देवाचा प्रसाद मिळविला पाहिजे.

**बाळा** : त्याचसाठीं आपल्यासारख्यांची संगत हवी. उगीच नाहीं विठाबाईनीं आपली जोड करून दिली होनाला.

**पुराणिक** : मग तो येईल त्याच्याबरोबर तूंही येत जा. दोन गुणी माणसांची मिळणी अनायासें होत असेल, तर कां न व्हावी ? पयसा कमलं कमलेन पयः । पयसा कमलेन विभाति सरः ॥

**बाळा** : म्हणजे काय पुराणिकबुवा ?

**पुराणिक** : अरे, पाण्यानं कमळाला अन् कमळानं पाण्याला शोभा येते. तसंच पाणी अन् कमळ या दोहोंमुळं सरोवराला शोभा येते.

**बाळा** : वा, दाखला तर मोठा नामी दिलांत, पुराणिकबुवा. ( थोडा विचार करून ) कमळाच्या जागीं होना अन् पाण्याच्या जागीं मी म्हणजे होनाजी बाळा-

[ बाळा हे शब्द घोळवितां घोळवितां शब्दांतून विचारांत रिघला. याच वेळीं " गुरूजी, अहो गुरुजी " अशा हांका ऐकूं येतात. त्या ऐकतांच पुराणिकबुवा " हो हो, आलों हं ! " असें उत्तर देतात. ]

**पुराणिक** : ( बाळाला उद्देशून ) सूर्योदय झाला वाटतं. विद्यार्थी पढायला आलेले दिसतात. जातों मी. मग बंडीचं काय करतोस ? थंडी अगदीं तोंडावर आली आतां.

**बाळा** : ती नाहीं वाजूं देत. काळजी नको. आज बंडी झाल्यावांचून तोंडांत पाणी घालीत नाहीं, असं समजा. मग तर झालं !

[ बाळाची ही प्रतिज्ञा ऐकून पुराणिकबुवा हंसतात आणि जावयास निघतात. तोंच गुणवती घाईघाईनें येते. बाळा तिच्याकडे पाहतो. पण पुराणिकबुवांसमक्ष तिची ओळख लपविण्यासाठीं मुद्दामच पाठ फिरवून उभा राहतो. याचा अर्थ तो पूर्व संकेतानुरूप यावयास उशीर झाल्या-मुळें रागावला असावा, असा करून ती बहुत अजीजीनें बोलूं लागते. ]

**गुणवती** : उशीर झाला कां रे बाळा मला ?

**बाळा** : ( तिच्याकडे आपादमस्तक पाहात, आश्चर्यानें ) गुणवती ? दुधानं अंग धुऊन आलीस कीं काय ग ?

**गुणवती** : म्हणजे काय रे ?

**बाळा** : अगदीं कोजागरी पौर्णिमेसारखी दिसतेस !

**गुणवती** : म्हणजे रे कशी ?

**बाळा** : कशी तें सांगून आतां काय उपयोग !

**गुणवती** : कां ?

**बाळा** : अग, ज्याला तूं बघणार होतीस, अन् ज्यानं आपल्याकडे बघावं असं तुला वाटत होतं, तो गेला मघाच, आईचं—बोट धरून.

**गुणवती** : वाटलंच मला. तरी मी आईला म्हणत होतें—

**बाळा** : काय म्हणत होतीस ?

**गुणवती** : कीं आधीं देवळांत जाईन, अन् मगच अंग धुवीन. पण आई म्हणाली कीं—

**बाळा** : आधीं अंग धू, अन् मगच देवळांत जा. असंच ना ? जशी कांहीं तुझीच पूजा व्हायची होती कीं नाहीं !

**गुणवती** : रागावतोस काय रे असा ! मोरशेटजींचा आग्रह, अन् सरदार भापकरांकडे पाहून आईचा दुजोरा— गाणं झालं पहांटेपर्यंत. म्हणून उशीर झाला रे.

**बाळा** : बाकीं तूं जरा आधीं आली असतीस म्हणजे होनाच्या आईनं माझी पूजा कशी केली, तें तुला बघायला मिळालं असतं.

**गुणवती** : ( निराशेनें ) मग कसं रे जमायचं हें ?

**बाळा** : अग, जमेपर्यंत असंच वाटत असतं. म्हणून कुठें धीर सोडून चालतं कां ? रामजोशीबुवा म्हणतात, मनुजा धीर धरी रे निका। नेदी सावधतेला धका।

**गुणवती** : ( खिन्न होऊन ) धीर धरी रे निका ! तुला काय होतंय सांगायला ?

**बाळा** : ( तिच्याकडे निरखून ) कां ग ? रुक्मीणीस लागे कृष्णाचा ध्यास । तिनें धाडिलें सुदेव ब्राह्मणास। असं कांहीं करणार आहेस कीं काय ? तरी बरं, अजून डोळ्याला डोळा भिडला नाहीं ! नुसतं गाणं ऐकून सुरांवरच तरंगते आहेस !

**गुणवती** : ते सूरच माझ्या कानांत रात्रंदिवस घोंगावताहेत. पडसादानं उमटताहेत. बाळा, ते सूर पुन्हा ऐकण्यासाठीं माझ्या जीवाची कोण घालमेल चालली आहे, हें तुला सांगून कसं कळणार ? विंचू चावल्याचं सांगतां येतं. त्याच्या चढणाऱ्या लहरींचं रूप करतां येत नाहीं.

**बाळा** : म्हणजे मदनविंचू डसलाच म्हणतेस अखेर ! आतां तो डोळ्यानं पाहिलेल्या रूपाचा नव्हे. कानानं ऐकलेल्या गाण्याचा, इतकाच फरक !

**गुणवती** : हरणासारखं मुकं जनावर मरण पुढं वाढून आलं तरी गाण्यावर लुब्ध कसं होत असेल, हें मला आतां समजलं. बाळा, शब्द गेला तरी सूर राहिला म्हणून मला क्षणिक आनंद झाला. पण तो राहिलेला सूरच नानापरीनं माझी छळणा करतो आहे रे ! त्यांतून माझी सुटका कोण करील ?

**बाळा** : शब्द गेला तर जाऊं दे, तो मी तुला आणून देतों असं मी म्हटलं आहे खरं.

**गुणवती** : केव्हां ? केव्हां आणून देतोस, याकडे माझे डोळे लागले आहेत. बाळा, त्या आशेवर मी सुराला जीवंत राहिल्यें आहे.

**बाळा** : सूर हा देव असेल तर तुझ्या आसक्तीनं तो भेटल्याखेरीज राहाणार नाहीं. तूं सूराला जडलीस, तसा मी शब्दाला जडलों आहे. म्हणून तूं अन् मी आज कोजागरी पौर्णिमेच्या मुहूर्तावर देवाला भाक देऊं...

**गुणवती** : नको बाळा.

**बाळा** : कां ग ?

**गुणवती** : मनांत आहे तें सगळंच्या सगळं कदाचित शब्दांनीं बोलून दाखवितां येणार नाहीं.

**बाळा** : म्हणजे मागावयाचं बरंच राहून जाईल म्हणतेस! आहेस खरी कळावंतीण.

**गुणवती** : असं हिणवतोस काय मला?

**बाळा** : नाहीं, वाखाणतो. कळावंतीण ही पुरुषाचं चित्त नी वित्त हरण करीत असते, असा तिचा पूर्वापर लौकिक आहे. होनाजवळ वित्त नाहीं, पण चित्त आहे. अन् तें अनमोल आहे.

**गुणवती** : म्हणूनच तें मला हवं आहे.

**बाळा** : मग देवळीं आल्यासारखं घाल देवापुढें गाऱ्हाणं! आतां तुझ्याहून माझं मागणं कांहीं वेगळं नाहीं.

[ गुणवती देवासमोर उभी राहून भक्तिभावानं गदगदलेल्या स्वरांत म्हणते—"देवा"— तोंच बाहेरून "पुराणिकबुवा" अशी हांक ऐकूं येते. स्वर ओळखून बाळा चकित होऊन म्हणतो, "गुणवती, होना." होनाची आणखी एक हांक ऐकूं येते. गुणवती वळून पाहाते. होना येतो. त्याला देवासमोर उभी असलेली गुणवती दिसते. दोघांची दृष्टिभेट होते आणि दोघेंही क्षणभर स्तंभित होऊन परस्परांकडे पाहतात. या आकस्मिक गांठीनें बाळालाही आनंद होतो. त्या भरांत— ]

**बाळा** : होना!

**होना** : ( तंद्री भंग पावून ) कोण बाळा? अजून तूं इथेंच?

**बाळा** : देवाच्या दारीं. तुझी वाट पाहात. कां आलास माघारीं?

**होना** : दूध घेऊन आलों. आज कोजागरी पौर्णिमा ना?

**बाळा** : ( गुणवतीकडे पाहात ) दूध, पण कोणासाठीं?

**होना** : पुराणिकबुवांसाठीं. कुठें आहेत ते?

**बाळा** : ते? मागें. आपल्या बिऱ्हाडीं. विद्यार्थ्यांना पढवीत असतील.

[ होना मानेनें होकार देत जाऊं लागतो. पण तो गुणवतीकडे पाहात निघालेला पाहून— ]

**बाळा** : हां हां, ( बोटानें दिशा दाखवीत ) पुराणिकबुवा मागें आहेत.

**होना** : ( चाचरत पण अभावितपणें झालेली चूक न दाखवितां ) मला माहित आहे रे! मघाशीं आई नव्हती कां गेली?

[ तरीदेखील तो गुणवतीकडे पाहातच जातो. तो गेला तरी गुणवती त्याच दिशेकडे मंत्रमुग्ध झाल्यासारखी पाहात राहते. बाळा खाकरतो. तेव्हां भानावर येऊन ]

**गुणवती** : बाळा…

**बाळा** : ( तर्जनी हलवीत ) अहं ! आतां बाळाला नको सांगूस ! काय सांगायचं तें देवाला.

[ पडदा

## प्रवेश तिसरा

[ बाळा कारंजकराच्या घरापुढील ओटा. त्यावर बाळाच्या फडांतील नाराज झालेले लोक तो येण्याची वाट पाहात बसले आहेत. बाळाच्या बोलण्यावर विश्वासून आपण विनाकारण त्याच्या फडांत सामील झालों, असें प्रत्येकास वाटत आहे. पण वाटतें तें छातीठोकपणानें त्याला सांगण्याचें आणि फुटून जाण्याचें धारिष्ट मात्र एकांतहि नाहीं. त्यांची नांवें बापू, धोंडी, पांडू वगैरे.

ही मंडळी अशी बसली असतां काशिराम नांवाचा दुसरा एक फडकरी येतो. हा त्या सर्वाहून गुणी व तडफेचा आहे. बाळाचा फड नांवारूपाला येणार नाहीं, अतएव यापुढें कुचंबत राहण्यांत अर्थ नाहीं असा निर्णय करून तो तसं बाळास स्पष्ट सांगण्यासाठीं आला आहे. पण बाळा घरीं नाहीं, असें समजतांच तो येईपर्यंतच्या अवधींत काशीराम आपलें मनोगत या फडकऱ्यांना सांगणार आहे आणि जमल्यास त्यांच्यापैकीं कोणी फुटून आपल्याबरोबर येणार असेल तर त्याला बगलेंत मारण्याचा त्याचा उद्देश आहे. ]

**काशीराम** : काय र, कुट हाये बाळा ? ( या प्रश्नास कोणी मानेनें तर कोणी हातानें नकार देतात. ) भाईर ग्येला ? ( तरी देखील कोणी तोंड उघडून सांगत नाहीं. तेव्हा तो ओळीनें प्रत्येकाच्या चेहेऱ्याकडे निरखून पाहिल्यानंतर ) असं र का त्वांड आवळून गच्च बसलांत समदीं ? कुट मौती–बिवतीला ग्येला व्हता जनूं ! धोंड्या, बाप्या ! अर, बोला की ल्येका हो ! वाइच उचकटा व्हटाचा सांदा ! हलवा जिबा !

**बापू** : कशाला ? चिकटाया टाळ्याला ?

**धोंडी** : या बाळाच्या घोळांत पडूनशेनी फसल्यागत झालंय, काशीराम.

**पांडू** : वज्याची बैलं गाळांत रुतल्यागत !

**काशीराम** : ( मान तुकवीत ) आत्ताशीक कळलं व्हय ? अर सजणानु, सासवडाला धूळ खाल्ली तवापुन सांगतुय !

**बापू** : मस्त सांगतुयास—

**धोंडी** : ( बापूला,-काशीरामाचें म्हणणें गणतींत नाहीं अशा स्वरानें ) सांग ना ! ( काशीरामास ) पर नवा फड हुबारायची आट धरली बाळासंग, ती काय फुटून चौ-वाटा जायाला ?

**काशीराम** : मग बसाच वज्याच्या बैलागत रुतुन ! इवळता का ?

**बापू** : म्हंजी ? त्वां पदर फाडलास ? मिळाले का तीन दगुड तुला ? क्येलीस का सवती चूल ?

**काशीराम** : हो हो, करनार हाये ! भ्येतो काय त्येला !

**धोंडी** : } बाळापासनं सवता व्हनार ?
**पांडू** : } आन् जाणार कुटं र ?

**काशीराम** : कुटं ? वाट फुटल तिकडं ! अर, आपला हात चालतुय आन् नरडं बोलतंय तंवर कुनीबी प्वाटांत प्वाट आन् घासांत घास करून दील !

**बापू** : } दील ? आन् न्हाइच कुनी दिलं—
**पांडू** : } हो, त्येचा काय सुमार—

**काशीराम** : ( स्वातंत्र्याच्या बढाईनें ) तुमच्यावानी बाळाच्या नांवानं म्या कुक्कू न्हाइ लावलं ! जाईन मानदेशांत, रागूच्या तमाशांत !

**बापू** : { सांगोल्याच्या रागूच्या ?
**धोंडी** : { म्हंजी ढोलकी तुंतुन्याच्या ?

**काशीराम** : व्हय व्हय ढोलकी-तुंतुन्याच्या ! का ? तुमच्या डफ-तंबुरीला लइ घुंगरं आटाकली आन् ढोलकीला काय कवड्याची माळ लागलीं व्हय ?

**पांडू** : ( सांत्वपनर ) तसं न्हवं काशीराम !

**काशीराम** : ( त्याच्या सांत्वनाला छद्म जोडीत ) मंग कसं पांडू !

**पांडू** : अर, गुलालबुक्का भ्येटंना म्हून काय माती लावशील का कपाळाला ?

**काशीराम** : काय हरकत ? काय जिंदगी बरबाद न्हाई हुईत ! अर, लगनाची न्हाई मिळली तर पाटाची ! आन् तीबी न्हाइ मिळली तर चुकल्या वाटची !

**बापू** : आँ ?
**धोंडी** : अर तुज्या ?
**पांडू** : शाप वायदा करतुस की !

**काशीराम** : मंग किती रोज गम खायची र ? याक नाल घावला म्हून फड हुबारूनशेनी बसला. अजून तीन नाल आन् तट्टू गवसल तवा डपावर थाप दील.

**धोंडी** : अर, व्हना गौळ्याच्या नादांत हाये त्यो !

**काशीराम** : व्हय हाये ! सासवडास्नं आला तसा त्याच नादांत हाये. भौऱ्यांत घावल्यागत ! व्हनाच्या भौत्या–भौत्यानं फुगडी घालतुया ! घालू द्या खुशाल ! आपुन चाललो ! कोन यनार हाये का माज्यासंग ?

**बापू** : पांडू, काय म्हंतोय काशीराम ?

**पांडू** : छातीचा गडी हाये त्यो ! पर आपलं कसं काय ?

**काशीराम** : इचार करा पुरता ! शेरडीवानी हुरळू नका आन् लांडग्याची पाट धरूबी नका. जायचं हाये रागूच्या तमाशांत. ढोलकीच्या ! डप–तंबुरी भ्येटनार न्हाई तंतं ! तुंतुनं आवळुनशेनी ढोलकीच्या कडाक्यांत नरडं फुटायची बारी यइल.

**बापू** : यउ दे र ! त्येला कोन भ्येतो !

**काशीराम** : आसं ? पर बाळा गुळचाट बोलंल, प्येचांत धरील–मंग नाडा तुटल्या मोटवानी गत हुइल !

**धोंडी** : ( बंडाचा पुढाकार घेऊन ) न्हाई व्हनार ! आमी ऱ्हातो तुजी पाट धरून.

**पांडू** : ( सावधतेनें ) पर बोलल कोन बाळासंग ?

**काशीराम** : भाक द्या तशी. आपुन बोलतो. काय चोरीचाडी न्हाइ क्येली त्येची !

**पांडू** : ( बाळाला येतांना पाहून, दबून ) आला, काशीराम बाळा आला.

**काशीराम** : यउ देर ! भ्येतो काय ! ठासून बोलतो. पर...

[ बाळा येतो. त्याला पाहतांच काशीरामाखेरीज बाकीचे तोंडें चुकवितात. काशीराम मात्र शब्दाला जागून जागच्याजागीं ताठपणानें नजर भिडवितो. हा प्रकार पाहून बाळाला फडांत दुही पिकल्याचा वास

येतो. म्हणून तो प्रत्येकाच्या चेहऱ्याकडे भेदक दृष्टीनें पहातो· तेव्हां ते अंग चोरतात, तोंडें चुकवितात. अखेर त्यांचा नायक जो काशीराम त्यालाच बाळा चांचपून पाहातो.]

**बाळा** : काय काशीराम, गळा साफ आहे कीं नाहीं ?

**काशीराम** : ( निःशंकपणें ) आपला गळा बारमाही साप, जित्या व्हाळागत.

**बाळा** : कां म्हटलं खर-चीर धरली आहे !

**काशीराम** : खर कशानं धरती !

**बाळा** : असंच पाहिजे. गाता गळा अन् शिंपता मळा. तर तो जीवंत राहातो. ( सलगीनें ) हें बघ काशीराम, होनाचा डोल आणलाय रचीत. अवचुकून पुरा झाला कीं तुझ्या गळ्याची करामत कसाला लागलीच म्हणून समज.

**काशीराम** : तुजा डोल सादल, डप ध्येकुन निगल, तवा करामतीचं पारडं रेकल ! उगच काय बोलनं ! पान्यांत म्हस आन् भाइर मोल.

[ या बेडर उद्गारामुळें बाळा जरा चमकून इतर फडकऱ्यांकडे आणि नंतर काशीरामाकडे पाहतो. बाळा हा फडाचा प्रेरक आणि मालक. पण 'हा घोडा आणि हा राऊत' अशी प्रत्यक्षाची हमी त्याला आतां-पर्यंत न देतां आल्यामुळें खाली पाहाण्याचा प्रसंग आला आहे. आपण मालकी अधिकारानें अगर मिळाऊपणानें फडकऱ्यांना आहारीं ठेवूं शकलों नाहीं, तर तें फुटणार हें त्याला ढळढळीत दिसत आहे. म्हणून तो क्षणभर गोंधळतो. इतक्यांत त्याच्याच फडांतला भवान्या हा नाच्या टुणकन् उडी मारून बाळापुढें येतो आणि मुरकून टाळी पिटतो.]

**भवान्या** : बाळाभाऊ, व्हनाजीराव.

**बाळा** : ( उत्सुकतेनें ) कुठें रे ? ( भवान्या बोट दाखवितो तिकडे पहात कांहीं न दिसल्यामुळें ) चल, चहाटळ कुठचा !

**भवान्या** : गळ्याच्यान बाळाभाऊ, तुमच्या !

**बाळा** : कुठें आहे रे ?

**भवान्या** : त्ये पगा, त्या चौकांत. जनवरासंग झुकत चालल्यात ! हायेका ?

**बाळा** : अरे खरंच ! होनाजीच तो !

[ त्याला हरळी देण्यासाठीं बाळा लगबगीनें पुढें होतो, तोंच लांबून ऐकूं येते—
" आहा आहा आहा, बघ बघ बघ जान्या, चंद्रा कुठं चालली ! "
यावर बाळाहि त्याच झोकांत उत्तर देतो—
" काहा काहा काहा, चंद्रा चालली मथुरेच्या बाजाराला ! "
या उत्तरानें होनाचें लक्ष आपल्याकडे वेधलें हें पाहून तो त्याला गांठण्यासाठीं जातो. बाळा गेल्याचें पाहतांच कटवाल्यांच्या सावधगिरीनें—]

**बापू** : काशीराम आता ?

**काशीराम** : अर आता काय ! जराशीक दम खाल का न्हाइ ? जोत जुपलं तसं वावर पिकलं का ? आत्ताशीक कुठं व्हना नदरं पडलाय !

**पांडू** : पर बाळा हाय त्यो. चिटाकला तसा अर्दा तुटून निगल, पर गुळाचा खडा न्हाइ सोडायचा.

**काशीराम** : अर पगू की ! त्यो गुळाचा खडा लवंडत येतोय का झुकांडी घेऊन-शेनी परबारा जातोय त्यो !

**भवान्या** : ( या संभाषणांत सामील न होतां बाळाच्या हालचालीकडे लक्षपूर्वक पाहात आणि कांहीं विशेष घडल्याचें दिसून आल्यामुळें टाळी पिटून ) यनार काशीराम. त्ये न्हवं का ? टाकला हात गळ्यांत.

**बापू** : अर कुनी ? कुनाच्या गळ्यांत ?

**भवान्या** : ( बाळाकडेच पाहात टाळी पिटून ) व्हनाजीरावाच्या ! ( पुनः टाळी ) बाळाभाउनी ! आग बाया ! अक्शी कासेला लुचत वासरू जसं. आल, आल व्हनाजीराव ! बाळाभाऊसंग आल व्हनाजीराव !

(सर्वजण भवान्याच्या दिशेकडे पाहातात होनाच्या खांद्यावर हात टाकून बाळा येतो.)

**बाळा** : असा रे कां ओळखीचा विडा कुस्करून निघाला होतास ?

**होना** : तसं नव्हे बाळा. जनावरं निघालीं घराच्या ओढीनं—

**बाळा** : निघालीं, तर नेईल जान्या ! आल्यासारखा जरा टेकशील कीं नाहीं ?

**होना** : नको रे ! माहीत आहे ना तुला ? तुझी सलगी आईला खपत नाहीं. रागावेल ती !

**बाळा** : ऑं ? आई रागवेल का बाइल रुसेल ! फार दाट दिसते रे दोघींची माया ! असूं दे ! मला ना आई, ना बाइल. एक दोस्त तुझ्यासारखा ! पण तो निघाला आहे सलगीचा वाडा ओस पाडायला !

[ हें बोलणें चालू असतां बाकीचे फडकरी होनाकडे कुतूहलानें पाहात आहेत. त्या सर्वांचें आपल्याकडे लक्ष आहे हें पाहून–]

**होना** : ही कोण मंडळी रे ?

**बाळा** : हां, असं कांहीं विचारशील कीं नाहीं ? सांगतों तुला. ही माझी फडकरी मंडळी. ( फडकऱ्यांस ) इतके दिवस सांगत नव्हतों कां तुम्हांला ? तो हा होना, माझा दोस्त बरं का ! होना, हे माझे सगळे फडकरी गुणी आहेत, कसबी आहेत. हा काशीराम, डफावर थाप मुरवीत आवाजाची अस्मानगिरी करणारा. हा पांडू, तंबोरीच्या तारेला गळ्याची तार मिळविणारा. हा बापू, सुरांची नवार ताणून लावणीची बिछाईत आंथरणारा. हा धोंडी, सुरांत सूर मिळवून शब्दांची छान करणारा !

**होना** : अन् हा ?

**बाळा** : हा भवान्या–नाच्या !

**होना** : ( सर्वांना ) रामराम मंडळी !

**भवान्या** : ( होनानें आपली दखल घेतली ही मोठी मेहेरबानी समजून ) व्हनाजी-राव मलाबी ? ऑं ? मलाबी ? ( होना होकार देतो त्यावर टाळी पिटून ) व्हय मलाबी. आग बाया, चाळ बांदा. बाळाभाऊ, चाळ बांदा पायांत.

**बाळा** : थांब रे, चहाटळ कुठचा ! चाळ बांधायला काय उशीर ! जा, लुगडं तर घे लपेटून आधीं ! दुकान मांडायच्या आधीच उचल्यांची घाई ! ( होनाच्या खांद्यावर हात टाकून पण फडकऱ्यांकडे पाहत ) आला आहे तसा बसूं द्या त्याला, स्वस्थ होऊं द्या. मग म्हणेल, आहे काय त्यांत ?

**होना** : काय म्हणेल ?

**बाळा** : अरे, तुझी ती गवळण !

**होना** : सासवडला ऐकलीस ती ? आहे वाटतं तुझ्या लक्षांत ?

**बाळा** : लक्षांत ? अरे, कानांत घुमते आहे. काल ऐकल्यासारखीं, आतां ऐकल्यासारखी. जरा उलगडून दाखीव, म्हणजे बघ ही मंडळी कशी कमान उभारून देतील ती !

**होना** : ( बाळाच्या तावडींत आपण सांपडूं या धास्तीनें ) अहं, बाळा जातों मी.

**बाळा** : ( जबरीने त्याला बसवीत ) बस रे ! जाशील.

**होना** : उशीर होईल बाळा, घरीं जायला. अन् जान्या घेईल तुझं नांव. मग आईच्या सपाट्यांत तुझ्यासकट माझी होलपट होईल.

**बाळा** : होऊं दे झाली तर ! किती दिवस आईच्या साउलींत खुरटणार तूं ? तिच्यापासून अलग झाल्याखेरीज शब्दांची वेल मांडवावर चढणार कशी ?

**होना** : विनाकारण पेंचांत धरतोस गड्या ! गद्दजोरी करतोस !

**बाळा** : ( चढाईपूर्वक ) करतो एवढ्यासाठींच कीं त्या वेलीचा ताणा बाजावा, मांडवभर पघळावा ! तिला रंगदार फुलं यावीं, घोसदार फळं यावीं अन् त्या फळा-फुलांचा मत्त सुगंध दाही दिशांत दरवळावा. असं मला वाटतं, पण तुझ्या आईला वाटत नाहीं. तरी तूं आईचा शब्द मोडावास, तिला दुखवावंस, असं मी म्हणत नाहीं. तुझी आई, ती माझीही आईच. तिला वाटतं तूं सगळा दिवस गवळ्याच्या शेण-गोठ्यांत काढावास अन् फावल्या वेळांत शब्दांची वाकळ शिवावीस. अन् मला वाटतं, तूं सगळा दिवस गाई हंबरतांना, वासरं चौखुर उधळतांना, फुलं मिटतां-उघडतांना पक्षी उडतांना, चांदण्या चमकतांना, चंद्र-सूर्य उगवतां-मावळतांना मनाचा बिंदू डोळ्यांत आणून टक लावून पाहावंस अन् पहातां पहातां शब्दांची कुसर साधीत कवनांची तलम शाल विणावीस. होना, तूं गुरं वळण्यासाठीं पर्वतीच्या रानांत जावंस ? छे छे ! तें काम जान्याचं, तुझं नव्हे ! तूं पर्वतीच्या रानांत जावंस ते धरणीमातेला आभाळ भेटतं कसं अन् कुठें, हें पाहाण्यासाठीं ! त्या दोघांचं चालणारं गूज ओळखण्यासाठीं अन् तें कवनांत फुलोऱ्यानं वठविण्यासाठीं. होना, हा तुझा मगदूर ! तो शास्त्रीबुवांनी ओळखला अन् पुराणिकबुवांनीं कसाला लावला !

**होना** : ( बाळाच्या आडंबरानें भारावून ) किती नांवाजतोस बाळा ! माझं मनोगत मलाच ऐकूं येण्याची मुष्कील व्हावी इतकं ?

**बाळा** : तुझं मनोगत तूंच ऐकून उपयोग काय ? तें तूं रोज पर्वतीच्या रानांत ऐकतोसच ! पण तें लोकांच्या कानीं पडेल तर त्याचा उपयोग आहे. अंगावरचं दूध आई रोखून ठेवूं लागली, तर त्याचा तिला काय उपयोग ? तें तिनं मुलालाच पाजलं पाहिजे.

**होना** : मनाचे पेंच मोकळे व्हावे, असं बिनतोड बोलणं बोलतोस तूं!

**बाळा** : बोलल्यासारखे पेंच मोकळे व्हावे! झाले तर मला, तुला, सगळ्यांना उपयोग होईल. होऊं दे. रोखून ठेवूं नको. मुलांचं तोंड आड झालं तरी आईचं दूध ओघळत राहतं, तसं होऊं दे.

**होना** : बाळा, काय हें तुझं लाघव? जणूं तुझ्या शब्दांचे पाझर माझ्या पायातळीं सांठले अन् तिथें दुलदुलीत शेवाळ उगवलं, असं वाटतं.

**बाळा** : शेवाळ ना? उगवूं दे. मी तुला घसरूं देणार नाहीं. उचल पाय, ठेव माझ्या खांद्यावर हात. हा पाहा मी निघालों, ये माझ्याबरोबर.

[ बाळाच्या या इशारतीनें सर्व फडकरी ओट्यावरून आंतल्या सोप्यांत जातात. त्यांच्या मागून होनाला घेऊन बाळाहि निघतो. ]

**होना** : ( अनिश्चित मनानें ) तुझ्याबरोबर? तूं मला वाट करून देतो आहेस अन् संभाळून नेतो आहेस खरा; पण बाळा, आई माघारून हांकारते आहे रे?

**बाळा** : सांग तिला येतो म्हणून!

**होना** : गहजब करतोस बाळा तूं. भारलंस मला, भुलभुलैयांत गोंवलंस!

**बाळा** : मी? मी नाहीं. स्फूर्तीच्या कळींत अडकलेल्या भंवरा, मी नाहीं. आतां त्या कळीच्या पाकळ्या फांकताहेत, रंगाच्या छटा उमटताहेत, सुगंधाच्या लहरी लोळताहेत. सुटलास तूं. आतां ठेव कानशिलावर हात, अन् झडझडून सुरांची तार खेंच अस्मानावेरी ताणून.

[ होनासह बाळा सोप्यांत दाखल होतो, तेव्हां सर्व फडकरी वाद्यें घेऊन सज्ज आहेत. भवान्या स्त्रीवेषांत पायांत चाळ बांधून उभा आहे. होनाच्या गवळणीची सुरवात बाळाच करून देतो. त्यानंतर होना म्हणूं लागतो. वाद्यांसह सुरांचीही साथ रंगते. ]

**होना** : **श्रीरंगा कमलाकांता हरी पदराते सोड ॥ ध्रु० ॥**
**आम्ही व्रजवासी नारी । जात असो कीं बाजारीं ।**
**अहो कान्हा मुरारी । अडवितां कां कंसारी ।**
**मथुरेच्या बाजारीं । पाहूं मजा हो गिरीधारी ।**
**विकुन नवनीत दधी गोड । श्रीरंगा० ॥ १ ॥**

ऐका लवलाही गृहीं गांजिती सासुबाई ।
परतुनया पाई । येऊं आम्ही ईश्वरग्वाही ।
यान देऊन कांहीं । मग जाऊं आपले ठाई ।
पतीभयानें देहरोड । श्रीरंगा० ॥ २ ॥

विनवुनी कृष्णासी । शरणागत झाल्या दासी ।
आणल्या गोपी महालासी । होनाजी रायासी ।
मती आगळी कविरायाची । धोंडी सदाशिव जोड । श्रीरंगा० ॥ ३ ॥

[ साथीसह कवन म्हणण्याचा होनाचा हा पहिलाच प्रसंग असल्यामुळें होणारी रंगत पाहून तो प्रसन्न होतो. सुरुवातीचा त्याचा संकोच, आईच्या निषेधाची धास्ती ही पार नाहींशी होऊन तो स्वतःचें कवन खुलवून म्हणणारा कवी या नात्यानें त्यांच्यांत मिसळून जातो. त्यामुळें गवळण म्हणून संपली व वाद्यांचे निनादही थांबले तरी तो म्हणणीनें निर्माण झालेल्या रुचींतच बुडी मारल्यासारखा धुंद झाला आहे. त्याची लागलेली लय ओळखून बाळा फडकऱ्यांच्या दृष्टीनें डळमळीत झालेलें आपलें आसन स्थिर करण्याच्या तजविजीस लागतो. ]

**बाळा** : पाहिलात, असा असतो कपारींतला पाझर ! होनासाठीं मी कां खोळंबून होतों तें कळलं कां आतां ?

**बापू** : } कां ?
**धोंडी** : } न्हाइ कळलं बा !

**बाळा** : हात् लेकांनों ! हत्यारांच्या नादांत अन् तालाच्या लयकारींत गढून गेलां ना ? मग कवनाचा जिवाळा कुठून कळणार तुम्हांला ?

**पांडू** : इक्त डोक्स न्हातं तर निस्त वाजवीत कां न्हाइलों असतो !

**बाळा** : मग काय करणार होनाची बूज तुम्ही ? ( निश्चल झालेल्या होनाकडे पाहत ) आतां नीट ध्यान द्या दुसऱ्या कवनाकडं. ए भवान्या, गुडघ्यांत मोडलास कां असा ! पाय चाळव जरा ! अन् पांड्या, तंबोरी कां रे थांबविलीस ? छेडून सूर घुमव. दे काशीराम थाप ! होना, झाली मंडळी तयार !

**होना** : कशाला ?

**बाळा** : नव्या कवनाला.

**होना** : अन् तें कसं करायचं ?

**बाळा** : कां ? हा भवान्या नाहीं का ?

**होना** : आहे. मग ?

**बाळा** : कसा आहे, गुळवेलीसारखा.

**होना** : कसा ?

**बाळा** : लवचीक रे ! नटचंचळ ! नवत्या पराईंतल्या रंभेनं खोळंबून हनुवटीवर बोट ठेवावं.

**होना** : याला पाहून ? या भवान्याला पाहून ?

**बाळा** : हो हो याला पाहून. बोल आतां कवन.

**होना** : ( आश्चर्यचकित होऊन ) याला पाहून कवन ? ( भवान्याकडे बोट दाखवून ) याला पाहून कवन ? ( बाळा गंभीरपणानें होकार देतो, त्यामुळें मोठ्यानें हसूं लागतो. )

**बाळा** : ( सर्वच फडकरी होनाच्या हंसण्यानें गोंधळतात. आतांपर्यंत प्रयत्नपूर्वक उमटविलेला ठसा पुसणार हें पाहून ) हंसतोस कां ? ( भवान्याला जवळ ओढून ) काय नाहीं याच्यांत ? नादर बाईची तऱ्हेदार चाल याच्या पायांत मुरली आहे. तिची कमानदार अंगमोड याच्या अंगांत करकरते आहे. तिच्या आयाची शान याच्या बाहुत्यांत लहरा मारते आहे ! तिच्या नयनाची गरगर याच्या नजरेंत फिरते आहे ! काय नाहीं याच्यांत ? याच्यापरती कोवळी गवळण कुठें भेटणार तुला ? अस्सल मथुरेची गवळण आहे ही ! तिची मुरक, तिची लपक, तिची गमक सगळं कांहीं. काय नाहीं याच्यांत ? उगीच नाहीं अवांतर तमासगिरांची झड पडत याच्यावर ! पण मी याला झाकून ठेवला तुझ्यासाठीं ? सुपारगोंड्याच्या फुलासारखा सदाच रंगदार. काय भवान्या, आहेस कीं नाहीं मथुरेची गवळण ? होनाला हवी तशी ?

**भवान्या** : ( मुरका मारून पाय चाळवीत ) हायेच मी गवळण ! मथुरेची ! चालल्ये पगा बाजाराला ! हां हां, व्हा दूर, लावाल धका माज्या धयादुदाच्या चरवीला !

[ भवान्याच्या अभिनयानें सर्व फडकरी खूष होतात. पण होना मात्र बाळा त्याचें वर्णन करीत होता तेव्हांपासून प्रतिकूल होत होत अखेर

तर भवान्याच्या अभिनयानें स्त्रीत्वाच्या सगळ्या अंगविक्षेपांचें विडंबन झालेलें सहन न होऊन संतापानें ताडकन् उभा राहतो आणि कविमनाच्या झालेल्या चिंधड्या भिरकावीत—]

**होना** : बाळा, हें नाहीं होणार !

**बाळा** : काय नाहीं होणार ?

**होना** : कवन.

**बाळा** : नाहीं होणार ? कां ?

**होना** : थट्टा मांडलीस काय माझी ?

**बाळा** : तुझी ? इतका कसा रे हळवट तूं ?

**होना** : मी हळवट ? अरे, त्या निबरट पोराला लुगडं नेसवून माझ्यापुढें उभा करतोस अन् खुशाल म्हणतोस मथुरेची गौळण ? अन् वर सांगतोस करायला कवन ? माझ्या डोळ्यांवर काय झांपड आली कीं माझ्या अक्लेचं खोबरं झालं ? काय समजतोस तूं ? ही गौळण ? मथुरेची ? अरे, हा अंतर्बाह्य नाच्या पोऱ्या ! मथुरेच्या गौळणीची संपादणी करणारा ओंगळ भवान्या ! याला तूं माझ्यापुढे उभा करतोस, अन् खुशाल कवन करायला सांगतोस ? बाळा कोंवळीक हा काय पदार्थ आहे, हे जाणतोस कां ? तरण्या अंगाची ओच काय असते हें माहित आहे कीं ? (भवान्याकडे बोट दाखवीत पण बाळाकडे रोखून पहात) याच्यांत आहे कां कुठं तिच्या अंगकांतीची झिलई ? हसण्यांतली कोमलाई ? (दोघांकडे पाठ फिरवून) ना मानेचा झोक, ना नजरेचा नोक ! अन् म्हणे ही मथुरेची गवळण ! छट् ! त्या मथुरेच्या गवळणीचं जुनेरं नेसण्याची लायकी नाहीं याची.

**बाळा** : (होनाच्या हल्ल्यापुढें दबून न जातां) याची नसेल-पण तुझी तरी अशी कोणती साजुक गवळण रे ! तूं तरी पाहिली आहेस ?

**होना** : पाहिली ? अरे नुसती पाहिली म्हणून काय विचारतोस ?

**बाळा** : मग काय तिच्याशीं कानगोष्ट केलीस ? कीं खेळलास तिच्या पदराची वाकडी करून ? काय केलंस तरी काय ?

**होना** : अशी मस्करीत ओढूं नको तिला. मी पाहिली ती गौळण-ती अन् तिच्या साजणी ! आल्या होत्या यमुनेच्या कांठी ! काहाळ्यांच्या अन् मांदळाच्या तालसुरा-

वर, चांदण्यांच्या झुंझुरक्यांत अंग डोलवीत होत्या. बासरीच्या लयींत अन् टिपऱ्यांच्या तालांत नाचत होत्या. जलद लयीनें नाचल्यामुळें घामेजून गेल्या होत्या. त्या सर्वच चित्तचकोर वासुदेवाच्या सहवासांत बेहोष झाल्या होत्या. त्यांची मुखरण, ती मथुरेची गौळण कृष्णकन्हैयाला घेऊन अकस्मात नाहींशीं झाली. तेव्हां त्या सर्वच बावरल्या, चरकल्या, आक्रोश करूं लागल्या. हें मी डोळ्यांनीं पाहिलं, अन् कानांनीं ऐकलं. तेंच माझ्या मुखावाटें बाहेर पडलं. तेंच माझं कवन.

**बाळा** : अशी आहे काय तुझ्या कवनाची कुळकथा ?

**होना** : हो हो, अशी आहे.

**बाळा** : तरीच त्यांत इतका जिवाळा ओथंबला आहे बरं कां. हें बघ होना, मला रे काय माहीत कवनासाठीं इतकं तद्रूप व्हावं लागतं तें ! मला वाटलं भवान्याच्या सोंगानंच काय पण भिंतीवरल्या चित्रानं देखील गौळणीची संपादणी होईल.

**होना** : कशी होईल ? चित्रांतल्या सूर्यानं मिटलेली कमळण उघडेल कां ?

**बाळा** : नाहीं उघडणार !

**होना** : मग ! मनांत ओलावा उपजल्याखेरीज कवनांत जिवाळा येणार कुठून ? अन् सजीवपणाची मूर्त डोळ्यांपुढें खेळल्यावांचून नुसत्या संपादणीनं ओलावा उपजणार कुठून ? बाळा, गौळणीचं कवन प्रत्यक्ष गौळण पुढें उभी राहिल्याखेरीज होणार नाहीं, समजलास ? म्हणून हें नेभळं सोंग माझ्यापुढें पुन्हां उभं करूं नकोस. जातों मी. (होना तडक तिघतो.

**बाळा** : गौळणीचं कवन गौळण उभी राहिल्याखेरीज नाही. (जातां जातां होना वळून पाहतो. ) समजलों मी. जा होना, उशीर होईल तुला. ( त्या दिशेकडे पहात ) ठीक आहे. गौळणच उभी करतो, थांब.

**धोंडी** : म्हंजी भवान्याची संपादनी फुकाट झाली का ?

**बाळा** : तें बघूं आतां. ( काशीरामासकट सर्व फडकऱ्यांना उद्देशून ) काशीराम, फड उभारायच्या ईर्षेनं आपण गोळा झालों. पण आजवर कुचंबत राहिलों. तुम्ही कंटाळला असाल; फुटून जायचा विचारही करीत असाल. पण आतांपर्यंत थांबलांत तसे आणखी कांहीं दिवस दम काढा. आणखी कांहीं दिवस मला सोबत द्या. आज तो गेला. त्याला पुनः कसं आणायचं ही हिकमत आहे माझ्याजवळ. मी

आणतों त्याला. मला उमेद आहे, तुम्हीही उमेद धरा. आतां फार दिवस नकोत. आपला फड उभा राहणार, ही गांठ मारून ठेवा.

**बापू** : ( सर्वांच्या वतीनं ) मग आमची तक्राद न्हाई. आपुन तुज्या रेगभाइर नाहीं.

[ बाळा त्यांच्या पाठीवर हात ठेवतो. ते जातात. पण काशीराम मागें राहतो. तो इतरांसारखें साफ बोलत नाहीं. परंतु त्याचा सुरवातीचा नूर पालटला आहे. बाळा त्याच्याजवळ जाऊन नरमाईनें— ]

**बाळा** : काशीराम, तूं किती गुणी आहेस हें काय मी ओळखीत नाहीं ? पण काय करूं ? अटकलों आहे होनासाठीं. त्याची परीक्षा झालीच असेल तुला. आहे ना तो जीव घोटाळण्यासारखा ?

**काशीराम** : हां हाये.

**बाळा** : मग थांब. चीज होईल. एवीतेवी दुपार टळली. भुकेजून गेला असशील. पण उतावळेपणानं साळीचा भात खाऊं नकोस. भूक मारून थांबलास तसा आणखी थोडी कळ काढ. तुला आंबेमोहराचा भात खायला घालतो. समजलास काशीराम ? ( बाळा त्याच्याकडे अनुमतीच्या अपेक्षेनें पाहतो. काशीराम संमतिदर्शक मान हलवीत कृतज्ञतेच्या नजरेनें पाहत बोलण्याहून मूकवृत्तीच अधिक बोलकी करीत जातो. इतका वेळ भवान्या पोरक्यासारखा कोपऱ्यांत उभा होता, तोच आतां पुढें येतो. )

**भवान्या** : ( रडक्या स्वरांत ) होनाजीराव रागावलं माज्यावर ?

**बाळा** : तुझ्यावर ? छे रे ? तुझ्यावर कशाला रागवेल तो. सपाट्यानं बोलून गेला इतकंच ?

**भवान्या** : रागावलं बाळाभाऊ. पार बिगाडलं वो !

**बाळा** : बरोबर आहे त्यांचं ?

**भवान्या** : त्ये कसं काय ?

**बाळा** : अरे त्याला पाहिजे मथुरेची गौळण !

**भवान्या** : मथुरेची ? आन् ती कुटनं आनायची ?

**बाळा** ; आणूं आणूं–घाबरतोस काय असा. ( हें ऐकतांच अवसान गळून गेल्यासारखा तो एकदम रडूं लागतो. ) कां रे ?

**भवान्या** : ती गौळण आल्यावर माला कोन पुसनार बाळाभाऊ ?

**बाळा** : (रडण्याचें कारण समजून हंसत) म्हणून रडतोस होय ? अरे मी आहे कीं खंबीर ! तुझ्या बाजूचा. जा तूं. (बाळा त्याच्या पाठीवरून हात फिरवितो. भवान्या डोळे पुशीत जातो. तोंच त्याला गुणवतीची हांक ऐकूं येते. बाळा वळून पाहतो. त्याला गुणवती लांबून येतांना दिसते. तिला पाहतांच) ही आली मथुरेची गौळण !

**गुणवती** : कोण मी ?

**बाळा** : होय तूं. तुझ्यावांचून दुसरी कोण ?

**गुणवती** : ती रे कशी ? दह्या-दुधाची हंडी देणार आहेस कीं काय डोक्यावर ?

**बाळा** : देणार आहे. बस इथें सांगतों.

**गुणवती** : बसायला नाहीं आले मी !

**बाळा** ; मग न्हाल्यावर मोकळ्या केसानं बाहेर पडूं नये, तसं तिन्ही सांजेचंही बाहेर पडूं नये. ती कां पडलीस ?

**गुणवती** : रोज येणारा तूं. चार दिवसांत फिरकला नाहींस-पाहा पाहा वाट पाहिली आतांपर्यंत.

**बाळा** : ती कां ?

**गुणवती** : अरे मला चोळी शिवून हवी आहे. उद्यांच्या उद्यां.

**बाळा** : वा, उद्यांच्या उद्यां ! जशी कांहीं तीथच खोळंबली आहे कीं नाहीं ?

**गुणवती** : खोळंबली आहे तर ! मला या खणाची चोळी घालून भापकरांच्या घरीं जायचं आहे. उद्यां. समजलं का ?

**बाळा** : सरदार भापकरांच्या घरीं ? मग तुझ्या आईनं फार लौकर जुळवून आणला ग घाट ?

**गुणवती** : कसला रे घाट ?

**बाळा** : त्या भापकरांच्या तरण्याबांड पोराला वेसण घालण्याचा !

**गुणवती** : उगीच बोलूं नको कांहींतरी ! ओटभरणाचं बोलावणं आलं आहे मला. गर्भाधान आहे त्यांच्या घरीं.

**बाळा** : तें कुणाचं ?

**गुणवती** : सरदारांच्या सुनेचं !

**बाळा** : मग? तें तुझ्या साक्षीनं होणार? (ही बोलण्याची हद्द झाली असें वाटून ती दोन्ही हात तोंडावर घेते.) अग, मग सांगशील कीं नाहीं? गर्भाधान त्यांच्या सुनेचं, अन् ओटी भरायची तुझी ती कां?

**गुणवती** : अरे, लग्नांतलं मणी-मंगळसूत्र कळावंतिणीकडून ओंवून घेतात कीं नाहीं? तशी गर्भाधानाच्या दिवशीं कळावंतिणीची ओटी भरतात. समजलं आतां! मग बोल, देणार आहेस कीं नाहीं चोळी?

**बाळा** : कां नाहीं देणार? ती तुला जशी ओटभरणासाठीं हवी, तशी मला मथुरेच्या गौळणीसाठीं हवी. कामांत काम जमून येतं म्हणतात तें असं!

**गुणवती** : अरे म्हणतोस तरी काय तूं? गौळण कुणाची?

**बाळा** : अग होनाची! आला होता तो इथें!

**गुणवती** : इथें? अगबाई, केव्हां?

**बाळा** : घटकासुद्धां लोटली नाहीं.

[इतक्यांत होनाची बायको सगुणा 'अहो बाळाभाऊ' अशी हांक मारीत येते. तो बाहेरच्या ओट्यावरच पाहून...]

**सगुणा** : आग बाया, ह्ये तर दारातच हुबं! (पण तेथें गुणवतीला पाहून ती पुढें येण्याचा संकोच करते.)

**बाळा** : कोण सगुणा? अन् अशा तिन्ही सांजीं कां आलीस ग तूं! (पण ती न बोलतां थबकून राहाते व तोंडही फिरविते. तें गुणवतीमुळें असें समजून) अशी कां अडखळतेस? हिच्यामुळें होय? अग, तूं तशीच ही, लाजायचं काय कारण? असं कांही आडवळणाचं काम नाहीं हं.

**गुणवती** : काय आडवळणी बोलणं हें!

**बाळा** : अग सांगितलेलं बरं! ती नुकतीच तुळशी-वृंदावनापुढें सांजवात करून आली असेल! तिच्यापुढें निकोप असावं.

**सगुणा** : जनवर घेऊन जान्या आला. पर ह्येंवा पत्त्या न्हाइ-तवा सासुबाईनीं लावलं.

**बाळा** : बरं झालं-पण होना इथें आला होता, हें कशावरून?

**सगुणा** : जान्याच बोलला.

**बाळा** : अर्रर्र! मग तुझी सासू गरजली असेल.

**सगुणा** : न्हाइ, तस काय बोललं न्हाई.

**बाळा** : बोलली नाहीं. पण मनांत समजली. आतां वेळ पाहून केव्हांतरी खरड काढील. काढूं दे. हें बघ सगुणा, आला होता होना. पण गेला घटकेपूर्वींच.

**सगुणा** : ग्येलंबी.

**बाळा** : गेला. तूं इथें आलीस अन् तो घरीं पोचला असेल.

**सगुणा** : मंग हलतें मी.

**बाळा** : कां येऊं पोचवायला ? नाहींतर तुझी सासू म्हणायची—

**सगुणा** : नग. जाइन यकली. ( जाते. )

**बाळा** : ( तिच्याकडे बोट दाखवीत ) होनाची बायको बरं कां ही ! कशी आहे साळीभोळी अन् भद्रकाळी.

**गुणवती** : बायको अशीच असावी.

**बाळा** : तें बरोबर. त्याशिवाय तुझे तीळ कसे विकणार ?

**गुणवती** : गुणानं सगळं कांहीं विकतं.

**बाळा** : बघूं आतां. मथुरेची गौळण होऊन निघालीस म्हणजे कळेल.

**गुणवती** : कोण मी ?

**बाळा** : हो हो तूं. मथुरेची गौळण प्रत्यक्ष पाहिल्यावांचून होनाचं कवन होत नाहीं. भवान्याला सोंग देऊन पाहिलं मी आतांच. अंहं. त्याला कस्तुरीच पाहिजे. वासाची माती चालत नाहीं.

**गुणवती** : मग मी होऊं मथुरेची गौळण ?

**बाळा** : हो, झालंच पाहिजे. मग त्यासाठीं वाटेल तें करायचं कबूल केलंस तें काय उगीच ? मथुरेची गौळण बनून पर्वतीच्या रानांत जायला पाहिजे.

**गुणवती** : पर्वतीच्या रानांत ? तिथें कशी रे जाऊं मी एकटी ?

**बाळा** : एकटी का ? मी आहे ना तुझ्या बरोबर.

**गुणवती** : पण आई काय म्हणेल ?

**बाळा** : अग तिला विचारूनच जायचं ! मी कांहीं घरांतून पळून यायला सांगत नाहीं तुला.

**गुणवती** : ती कबूल झाली पाहिजे.

**बाळा** : न व्हायला काय झालं? मी सांगेन! तें काम माझं. पण गौळणीची हुबेहुब संपादणी करून त्याला गोकुळांत रमवायचं काम तुझं!

**गुणवती** : गोकुळांत?

**बाळा** : म्हणजे पर्वतीच्या रानांत!

[ पडदा ]

## प्रवेश चौथा

[ पर्वतीच्या रानांत. वेळ तिसऱ्या प्रहरानंतरची. टेकाडावरील झाडाखालीं घोंगडी टाकून होना कळक ताशीत बसला आहे. तो कळकाचा पांवा करण्यांत गुंतला आहे. तोंडानें गुणगुणत आहे. आजूबाजूला पण प्रेक्षकांच्या दृष्टिक्षेपाबाहेर चरणाऱ्या जनावरांचें हंबरणें ऐकूं येतें. त्यांच्या गळ्यांतील घंटांचा नादही ऐकूं येतो. लांब कोठें तरी कोणाची बाचाबाची झाल्याचें ऐकूं येतें. तेव्हां होनाजी मान उंचावून अधिक लक्षपूर्वक त्या दिशेकडे पाहतो आणि हंसत आपल्याशींच म्हणतो—

"जान्यानं कांहीं रेटाई केली वाटतं!" आणि पुनः कळक ताशीत गुणगुणूं लागतो.

क्षणभरानें जान्या हातांत काठी घेऊन धावत पण लंगड्या पायाचें प्रदर्शन करीत येतो. होनाकडे पाहून काठी आपटतो आणि बसकण घेतो. धापा टाकीत लंगड्या पायाच्या तळव्याकडे पाहूं लागतो. तोंडानें म्हणतो. "कोंडवाडा दावतोय!" बोटाच्या चिमटीनें काटा काढतांना "स्-स् हाय" असें म्हणून चिमटीकडे तिरस्कारानें पाहात कांटा दूर फेंकून देतो. ]

**जान्या** : गरीब म्हनं गायीची जात! कोण म्हनत असल त्येच त्वांड गुळचाट झालं असन खरवसानं!

**होना** : ( जान्या येऊन बसल्याचें पाहूनही आपल्याच नादांत ) जान्या, गायीसारखं अश्राप जित्रब धुंडूनही भेटणार नाहीं. अन् त्याला तूं नांवं ठेवतोस!

**जान्या** : अश्राप! तूं म्हन अश्राप! अर, चौचाल श्येरडी पुरावली, पर त्या खोड्याळ गायींची बेसुमार तस्ती!

**होना** : काय झालं ?

**जान्या** : ( त्याच्या सुराचा बेसुर करीत ) काय झालं! तुज्या त्या पुतळीनं भरल्या श्येतांत त्वांड घालून कवळा शाळू उडावला आन् कुनबीदादाला छुकांडी येतांना माज्या पायांत काटा नेटला ! म्हन काय झाल ?

**होना** : हात्तेच्या कांटाच ना ? अरे, गोवाऱ्याच्या पायांत कांट्याना काय तोटा. नेटला असेल तर टाक उपसून अन् थुंक त्याच्यावर.

**जान्या** : कुनावर कुनबीदादावर ?

**होना** : कुनबीदादावर ! मग राहील का तुझं तोंड जाग्यावर ! अडाण्याची जात लेका तुम्ही. कुणबीदादावर नव्हे, कांट्यावर

**जान्या** : काट्यावर थुकून काय व्हतय ! नेटला तसा कळ गेली डोसक्यांत आन् पानी आलं डोळ्यांत ! आग लागो त्या गायींना. संबाळ तुज्या तूं. चाललों मी !

**होना** : चाललास ? अरे, काटा नेटला म्हणून गायींवर रागावून भागतं कां ? तासायला येईना, तर म्हणे वाकसाला धार नाहीं.

**जान्या** : आरानकीनं बोलाया तुला काय व्हतंय. कवाचा पगतोय कळक ताशीत बसलास खस्साखस्सा !

**होना** : पावा करतोय जान्या ! उगाच ताशीत बसायला मी काय रिकामा सुतार आहे होय ? आता ही जीभ मुडपली कीं बघ कसा वाजेल तो.

**जान्या** : काय वाजल ?

**होना** : पांवा रे !

**जान्या** : वाजल ! वाजल गारुड्याच्या पुंगीवानी आन् जित्राबबी डोलत्याल नागावानी !

**होना** : शक आहे कां तुला ? अरे कृष्णानं पांवा वाजविला तर सगळं गोकुळ डोलवलं ! ढवळून काढलं ! तिथं नुसत्या जित्राबाची काय कथा !

**जान्या** : अर गोकुळच्या गोपाळ्या ! त्ये पुरानांत, पर्वतीच्या रानात न्हवं !

**होना** : नव्हे कसं ! या इथें, पर्वतीच्या रानांत गोकुळ उभं करून दाखवितो तुला ! आहेस कुठें ! हं, पावा मात्र वाजविला पाहिजे जीव ओतून-मग बघ, गौळणी कशा जमतील तें !

**जान्या** : हां जमत्याल ! मंग फ्येर धरून नाचशीलबी त्येंच्यासंग ! खुशाल नाच. व्हऊन जाऊद्या तुझ्या जिवाची शर्त ! मी जातो घराकडं !

**होना** : एवढी कां रे घराची असोशी तुला ?

**जान्या** : मंग काय तर ! त्या पुरानीकबुवांच्या संगतींत तुज्या डोसक्यानं ठाव सोडलाया ! इरभळ गोकुळ आन् किस्न, किस्न आन् गोकुळ ! कुट यखांदी चटकदार राधा तर पगुन न्हाइ ठिवलीस ?

[ पूर्व योजनेप्रमाणें गुणवती व बाळा आलेले असून ते होनाला एकटा गांठण्याची संधी पाहात आहेत. गुणवती डोकावून पाहते. ]

**होना** : ( राधेचें नांव उच्चारतांच होनाचा नूर एकदम पालटतो. आतांपर्यंत तो खेळकर होता. तोच यापुढें गंभीर होतो. ) राधा ? इथें नाहीं, पण सासवडला पाहिली होती. राधा पाहिली होती अन् कृष्णही !

**जान्या** : ब्येस !

**होना** : कृष्णानं मुरली वाजविली, तेव्हां राधेची अन् इतर गौळणींची कशी गाळण उडाली, हें म्यां पाहिलं.

**जान्या** : निस्ती वाजवून ?

**होना** : अरे, मुरली म्हणजे काय समजलास तूं ! अन् ती कृष्णानं वाजविलेली ! नुसता नाद ऐकल्याबरोबर हातचा घास हातांत अन् तोंडचा तोंडांत ! घरचा कामधंदा सुचेनासा झाला गौळणींना ! तेव्हां त्या साऱ्या जणी जमून राधेकडे गेल्या. जाऊन कृष्णाच्या जबरदस्तीचं गाऱ्हाणं गायलं. तेव्हां साऱ्या गौळणींच्या वतीनं राधा म्हणाली—

**कुणी घ्या हो मुरली करिची ।**
**शुद्ध मी विसरलें घरची ॥ ध्रु० ॥**

**जान्या** : कोन म्हनाली, राधा ?

**होना** : हो राधा म्हणाली–

**ऐकुनियां श्रवणीं मुरली । भ्रांति नाहीं मज उरली ।**
**नांवें वृत्ति तव हरली । वाजवि माधव परोपरीची ॥ १ ॥**

**जान्या** : असं राधा म्हनली का ?

**होना** : असं राधा म्हणाली. त्यानंतर दुसरी काय म्हणाली—

**दुसरी म्हणे श्रीहरि तो। येउनि आम्हांला धरितो।**
**नाना परि छळणा करितो। वाईट हो खोड हरीची ॥ २ ॥**

**जान्या** : मंग काय म्हनल तर !

**होना** : तेव्हां तिसरी काय म्हणाली —

**जान्या** : दोन न्हाइ पुरल्या, तवा तिसरीबी आली जनू !

**होना** : **तिसरी म्हणे पुरे ही मस्ती। सोसावी किती बदमस्ती।**
**धरि करि हा धिंगामस्ती। फाडली कंचुकी जरिची ॥ ३ ॥**

**जान्या** : (डोकें खाजवीत) कंचुकी म्हंजी काय र व्हना ?

**होना** : कंचुकी माहीत नाहीं तुला ?

**जान्या** : न्हाइ बा !

**होना** : अरे, (सरळ अर्थ न सांगतां अंगांत चोळी घालून गांठ मारण्याचा भाव करीत) म्हणजे कंचुकी !

**जान्या** : (बुचकळ्यानें) म्हंजी काय र ! वाइच उकलून दाव की !

**होना** : अरे उकलून दाखविल्यावर राहिलं काय ! हें बघ, आपण धोतर नेसतों, अन् अंगांत काय घालतों ?

**जान्या** : बाराबंदी.

**होना** : तसं बायका लुगडं नेसतात, अन् अंगांत काय घालतात !

**जान्या** : ऑं ? इक्तं कळंना काय मला. बाया काय घालत्याल ! चोळी.

**होना** : मग कंचुकी म्हणजे तीच.

**जान्या** : चोळी ? (अर्थ उलगडल्यामुळें बेदम हादरून) आर तुज्या ! इक्ता आगावपना ? चोळी फाडली ? आन् तीबी जरीची ? च् च् च् सुताच्या खनाची न्हव, जरीची ? (गंभीरपणानें) व्हना, त्यो तुजा किस्न लइ खोड्याळ अं ? सांगून ठिवतो. गौळनींबी लइ अगोचार असत्यात यकक ! दाटून आपुनच फाडत्याल चोळी, आन् म्हंत्याल त्वां फाडलीस ! हां, संबाळ रे ! वाट जाशील त्येंच्या अना फुकाट बैदा करून बसशील. त्येच्यापरिस ती बाळाची गौळन लइ नामी !

[ गुणवतीप्रमाणें बाळा डोकावतो ]

**होना** : छट्! बाळाला काय माहीत गौळण कशी असते तें! मी पाहिली तसली गौळण त्यानं कुठं पाहिली आहे? म्हणून त्यानं काय केलं माहीत आहे का? नाच्यापोऱ्यावर साज घालून गौळण केली. अन् मला म्हणतो कसा? समज हीच मथुरेची गौळण अन् घडीव तुझ्या लावणीची घडण!

**जान्या** : मंग कां न्हाइ केलीस?

**होना** : काय लावणी? अरे गाढवाला बघून कुठें घोडं कळतं कां कसं असतं तें!

**जान्या** : कां न्हाई कळनार? यक न्हान अन् दुसरं वाइच थोर! यापरीस गाढवांत अन् घोड्यांत फेर काय?

**होना** : जान्या, जान्या, तुझ्या अकलेची हद्द झाली! जरा चेपून बोललों तेव्हां बाळा वरमून तरी गेला. पण तुझं तेरे उपर मेरी!

**जान्या** : मंग तूं बरा थाप हांतोस ती!

**होना** : कशाची थाप?

**जान्या** : म्हन तो किस्न आन् ती राधा सासवडाला पगितली. आन् त्या गौळनीबी! अर, त्या पुरानिकबावानं पुरानाचं गुळमाट क्येलं आन् त्वां वरपलस कोपरापावतर!

**होना** : जान्या, गौळ्याच्या जातीला येऊन राधाकृष्णाची चेष्टा करतोस? अरे पुराणिकबुवांनीं किती रसभरित वाणीनं गोकुळ उभं केलं! नुसते राधाकृष्णच नव्हे; तर तिथल्या गौळणी, गौळयाचीं पोरं, गायीवासरं इतकंच नव्हे तर हिरव्या चार कुरणासह यमुनेचं तीर झाडझाडोऱ्यासुद्धां नटवलं! तेव्हां तें माझ्या डोळ्यापुढें सजीवपणानं डोलूं लागलं. मला वाटलं, जावं मनाचा वारू करून गोकुळांत अन् मिसळाव त्या कृष्णकन्हैयाच्या मेळाव्यांत! (होना बोलतां बोलतां एकचित्त होतो आणि झाडाला टेकून अंतराळांत नजर खिळवितो. सावकाशपणानें म्हणतो) कृष्णकन्हैयाच्या मेळाव्यांत!

[आणि त्यांतच लय लागून स्थिर होतो. जान्या जनावरांकडे पाहात एका बाजूनें निघून जातो. बाळा व गुणवती दुसऱ्या बाजूनें पुढें येतात व होनाकडे एकदा पाहून जान्या परत येतो कीं काय इकडे लक्ष देतात. होना हातांतील पावा ओठाकडे नेतो. ओठावर टेकवितोही. पण फुंकर

घालून सुरांचा निर्गम करण्याइतकें त्याचें लक्ष विभागलेलें नाहीं. तो आकाशाकडेच स्थिर मनानें व दृष्टीनें पाहात आहे.

जान्या क्षणभर दृष्टीआड होतो. पण जनावरें घरच्या ओढीनें निघालेलीं पाहून आपणही निघावें हें होनास सांगण्यासाठीं येतो. तो येतांच बाळा व गुणवती दृष्टीआड होतात. होना निश्चळ पुतळ्यासारखा उभा पाहून—]

**जान्या** : ह्यो चालला अतराळांत! गडी जानार थेट मुक्कामाला. जा. गोकुळमथुरा वृंदावन ये सैर करूनशेनी खुशाल. (बाळा पुढें येऊन गुणवतीला हलक्या आवाजांत "हो पुढें" असें म्हणतो. गुणवती हातानेच त्याला नको असें खुणविते. जान्या निघालेल्या जनावरांना थोपविण्यासाठीं) अग हैक, हो हो! (या अचानक आरोळीनें दचकून गुणवती दोन पाउलें माघार घेते बाळा तिचा हात धरून थोपवितो. जान्या होनाकडे पाहात—) न्हाइ येत तूं? सांगतो मामीला, सा भाकऱ्याचा बस्ता बांदाया सांगतो. वाटत हुइल तुला न्यारीला. (इकडे जनावरांची हालचाल पाहून) अग ए पुतळी! पुतळी हो! ऑं ऑं, कुट चाललीस थरकत? हैक! (बाळा पुनः गुणवतीला 'हो पुढें' असें म्हणतो पण ती नाकारते) समद्या चालल्या की घराच्या मेरेनं. ए चंद्रा, अशी कां लसतीयास? नीट चल वाटेनं? (होनाला) चाललो रे व्हना! नीट हुशारीनं न्हा! यखांद्या गौळणीची धरशील वाट आन् तो कुबांड घेऊनशेनी मामीपत्तर करील बोभाट! (जान्या हैक हैक म्हणत जातो.)

[जनावरांचें हंबरणें गळ्यांतील घंटानादासह अस्पष्ट होत होत शांत होतें. जान्या गेल्याचें पाहून बाळा गुणवतीचा हात धरून पुढें येतो.]

**बाळा** : आतां हो पुढें.

**गुणवती** : नको रे. छाती धडकते.

**बाळा** : धडकायला काय झालं. तो काय नादिरशा लागून गेला कां? नेट धर पायांत!

**गुणवती** : अन् काय बोलूं?

**बाळा** : तें देखील मीच सांगूं? तो आतां मनानं गोकुळांत रमला आहे. खुशाल राधेची संपादणी कर. पण अशी कर—(या अवधींत होना पाव्यांतून एक लकेर मारतो. गुणवती छातीवर हात घेते.)

**गुणवती** : नको बाबा, मला नाहीं धीर होत.

**बाळा** : मग लहान असतीस तर गुळाचा खडा हातावर ठेवला असता ग !

**गुणवती** : काय करूं ? पाऊलच उचलत नाहीं बघ.

**बाळा** : काय करावं आतां तुला. फुकट होणार कीं काय हेलपाटा ? आई आठवण काढून तरी हो पुढें ! कीं चलतेस माघारी ? ( होना पुनः एक लके मारतो ) नाहीं, आतां नाहीं माघार. हो पुढें. मी राहतो त्या टेपाडावर–करंज्याच झाडाआड ! ( पुनः लकेर ) बस, पकड हाच सूर. जातों मी.

[ बाळा जातो. गुणवती आधार तुटल्यासारखी कावरी बावरी होते. एकवार गेलेल्या बाळाकडे आणि एकवार होनाकडे पाहते. होना अखेरची लकेर मारून हताश मुद्रेनें पावा खालीं टाकतो. तो उतारावरून घंरगळत, घुंगुरामुळें खुळखुळत घोंगडीच्या दशांवर जाऊन थांबतो. होना त्या पडलेल्या पाव्याकडे पाहत आहे. गुणवतीही त्या पाव्याकडेच पाहात एकेका पाऊलानें पुढें जात आहे. तिचीं पाऊलें दृष्टीच्या टप्यांत येतांच होना त्यावरून नजर वर करीत तिच्या मुद्रेवर नेतो आणि तिला पाहतांच मानेला झटका देऊन त्या मुद्रेवरच दृष्टी स्थिरावतो. गुणवतीही त्याच्या डोळ्याला डोळा भिडवून मुग्ध होते. दोघेही परस्परांकडे पाहात क्षणभर चित्रासारखे राहतात. अखेर खर्ज छेडावा त्या स्वरांत— ]

**होना** : राधा ?

[ होनाच्या संबोधनानें आणि आपणांस राधेची संपादणी करावयाची आहे या जाणिवेनें गुणवती अधिकच स्तंभित होते. उत्तर न देतां ती पूर्वीसारखीच निश्चल राहते. होना आणखी दोन पाउलें टाकून तिच्या सन्मुख येतो आणि त्याच स्वरांत— ]

**होना** : गौळणीची मुखरण राधा तू ?

[ गुणवती मानेनें होकार देत ओठ हालविते. पण त्यांतून शब्द फुटत नाहीं. तेव्हां कलत्या मानेनें होना पुनः विचारतो— ]

**होना** : तूं राधा !

**गुणवती** : ( मानेचा होकार देत ) अन् तूं कृष्ण ?

**होना** : तो शोधीत होता तुला.

**गुणवती** : अन् मी शोधीत होते त्याला.

**होना** : यमुनेच्या काठीं—

**गुणवती** : कळंबाच्या तळवटीं—

**होना** : अवांतर गौळणींना चुकवून—

**गुणवती** : तुझ्या बांसरीची खूण ओळखून—

**होना** : ( प्रथम तिच्यावरील नजर काढून पाव्याकडे पाहात ) त्या बासरींत नुसताच सूर आहे.

**गुणवती** : तोच माझ्या जिव्हारीं सलतो आहे.

**होना** : पण त्यांत शब्द नाहीं. राधे, त्यांत शब्द नाहीं.

**गुणवती** : शब्द नाहीं ? सूर आहे, अन् शब्द नाहीं ?

**होना** : नाहीं. म्हणून तर मी निराशेनं ती हातावेगळी केली.

**गुणवती** : तीच चूक झाली. उचल बरं ती, ठेव ओठांवर अन् घाल फुंकर ! जीव एकवटून फुंकर घाल म्हणजे पाहूं सुरांमागून शब्द येतो कीं नाहीं तें !

**होना** : नाहीं, मी तिला फिरून हात लावणार नाहीं.

**गुणवती** : कां ? रुसलास तिच्यावर, कीं ती रुसली तुझ्यावर ? ( पांवा उचलून हातांत घेत ) यांत शब्द नाहीं म्हणतोस ?

**होना** : नाहीं. नुसता सूर आहे. उमटल्यासारखा वाटतो—शब्द; पण बुडबुड्यासारखा विरून जातो.

**गुणवती** : चकवतो आहे तुला ?

**होना** : डोंगरदऱ्यांतल्या झऱ्यासारखा ! तो झरा कसा बुद्‌बुदून उमटतो, खळाळून वाहतो, पडतो तिथें फेंसाळतो अन् पाणीरूप होऊन पुनः वाहात जातो. शब्द बरोबर घेऊन.

**गुणवती** : मग त्याच्या मागोमाग तुलाही जायला हवं.

**होना** : पण समुद्र तर जागच्या जागीं आहे ! तो देखील लाटा आपटतो, खदखदून फेसाळतो, अन् पुनः पाणीरूप होऊन हेलकावत राहतो. पाणी अफाट अन् घोंगावाही अफाटच ! शब्दाचा अफाट भास कायम ठेवून !

**गुणवती** : मग झऱ्याची गती आणि समुद्राची स्थिती असं त्या शब्दांचं चरित्र आहे, हें तुझ्या लक्षांत नाहीं येत ? सुरांची गती घेऊन तर पाहा, म्हणजे शब्दांची स्थिती आपोआप येईल.

**होना** : मी केव्हांचा लय लावून इथें उभा आहे, हें तुला माहित नाहीं. म्हणून तूं असं बोलतेस. आकाशांत शब्दांचीं अनेक रूपं मी पाहतों आहे. एखाद्या वेळीं एखादा शब्द नक्षत्रासारखा निखळून पडतो. मी तो झेलायला जातों. पण तो निसटतो अन् त्याच्या गतीचा वारा माझ्या हाताला चाटून जातो.

**गुणवती** : मग तो शब्दाचा भास तर नसेल ?

**होना** : भास नाहीं. मला शब्दांचे आकार दिसतात, त्यांची स्पष्ट रूपंही दिसतात पण ते वाणीच्या टप्प्यांत येतांच वायुरूप होऊन जातात. पक्षी उडतांना शब्द करीत जातो, तें कधीं ऐकलं आहेस ? हरिण चौखुर उधळून नाहीसं होतांना कधीं पाहिलं आहेस ?

**गुणवती** : म्हणजे पक्षी उडतांना ऐकूं येणारा सूर अन् हरिण उधळतांना दिसणारं रूप तुला शब्दाच्या खोळींत ठासून भरायचं आहे ?

**होना** : बरोबर ओळखलंस. अन् तें कसं भरायचं हें मला सांगायला तूं आलीस ?

**गुणवती** : नाहीं. माझ्या बुद्धीची झेप इतकी ठोसर नाहीं. मी आलें ती तुझ्या बांसरीच्या सुरांमुळं ! त्या सुरांमागें शब्द असेल, असं समजून मी आल्यें. शब्दासाठीं तुझी इतकी धांवपळ चालली असेल, ही मला कल्पना नव्हती.

**होना** : केवळ शब्दांसाठीं ! कारण शब्दांवाचून मनोगत उकलून दाखवितां येत नाहीं. सुरांचं रांधप खूप सुगराईनं केलं अन् जेवत्या शब्दावांचून नुसत्या ठावावर वाढप करण्याची वेळ आली, तर ती सुगराई रांधपापोटींच जिरून गेल्यासारखी नाहीं कां ?

**गुणवती** : हें खरं. पण त्याबरोबर तूं हें विसरलास कीं कळी उमलत असतांना सुगंधाचा वर्षाव करीत राहिली तर तिचा मागोवा घेत कुठून तरी भुंगा रुंजी घालीत येतो. येतो किं नाहीं ? म्हणून कळांचा सुगंध हा सूर अन् भुंग्याची रुंजी हा शब्द, असं नाहीं तुला वाटत ?

**होना** : देखाव्यांत साळीभोळी, पण मतलबांत त्या कळीसारखीच लबाड **अन्** आंतल्या गांठीची दिसतेस ! सुगंधाच्या लालचीनं तूं मला पुनः सुराकडेच **खेंचून** नेणार आहेस. मला वाटलं, आकाशांतून अवतरल्यासारखी तूं अवचित आलीस, ती मला शब्दांचं दानच द्यावयाला आलीस.

**गुणवती** : असं वाटलं तुला ? पण जें माझ्याजवळ नाहीं, तें मी तुला कुठून देणार ? तुला हवं आहे तें तुझ्याचजवळ आहे. तें तुझ्या मुखांतून वदविण्यासाठीं मी आल्यें आहे.

**होना** : काय चमत्कार करणार आहेस तूं ?

**गुणवती** : चमत्कारांतून शब्दांची उपज होत नाहीं. झाली तर ती टिकत नाहीं. पक्ष्याचं उडणं अन् हरिणाचं उधळणं याला चमत्कार म्हणतोस तूं ? नाहीं. त्यामागें राबणूक आहे, सराव आहे. अन् तेंच तुलाही करायला हवं.

**होना** : हेंच सांगायला आलीस होय.

**गुणवती** : हेंच. कारण या बांसरींत सूर आहे. अन् त्या सुरामागोमाग शब्द येणार आहेत. हेंच माझ्या साळेभोळेपणाचं अन् मतलबाचं वर्म मी तुझ्या हातावर ठेवणार आहे. आतां तरी घे ती बांसरी.

**होना** : मी कंटाळलों तिला.

**गुणवती** : बांसरीला ? ती चवेल आहे म्हणून ? आहे ती चवेल. तारुण्यानं सळसळलेल्या रूपकळेसारखी निकरटही आहे. मी जाणतें तिचं मन ! घे ही बांसरी ! लाव ओठाला. घाल फुंकर ! घे रे !

**कां उगलास मुरारी । वाजवि तव बांसरी ॥ ध्रु० ॥**
**सहजांत उभी मी दारीं । फुलें अंगणीं वेल मोगरी ।**
**श्रवणीं पडली मधुर बांसरी । धावत आले वनाभीतरीं ।**
**म्हणते, वाजवि तव बांसरी ॥ १ ॥**

**तुझी बांसरी ऐकुनि कानीं । गायी भुलल्या घास टाकुनी ।**
**श्वापदगण ते तटस्थ रानीं । पक्षि थबकले वृक्षांवरुनि ।**
**म्हणती, वाजवि तव बांसरी ॥ २ ॥**

**ध्यान विसरले पार्वतीपती। रथा थांबवी सूर्य–सारथी।**
**हिंडणवारा स्थिरावी गती। देव चमकले चहूं दिशांतीं।**
**म्हणती, वाजवि तव बांसरी ॥ ३ ॥**

[ गुणवती हें गाणें म्हणत असतां होना झाडाला टेकून आकाशांत दृष्टी स्थिरावून निश्चल होतो. गाणें संपवितांच गुणवती त्याच्याजवळ जाते, बांसरी पुढें करते. तिचें सान्निध्य जाणवतांच तो गुणवतीकडे त्याच स्थिर दृष्टीनें पाहतो आणि तृप्ततानिदर्शक एक निःश्वास सोडतो. ती फिरून बांसरी पुढें करते. तो ती नाकारतो. ]

**होना** : कशाला ? आतां नको ती बांसरी !

**गुणवती** : ( सखेदाश्चर्यानें ) नको ? अरे, ती तूं वाजवावीस म्हणून मी तुला आळवलं, तरी तूं नको म्हणतोस ? आतां कोण्या परीनें तुझी मनधरणी करूं ? घे, घे, वाजवि तव बांसरी !

**होना** : बांसरी ? बासरी कसली ? बांसरी नव्हे ती !

**गुणवती** : ( या साफ नकारानें दोन पाउलें मागें घेत ) काय ? ही बांसरी नव्हे ?

**होना** : ( तिच्या रोखानें पुढें येत ) नव्हे ! आतां तुझा गळा हीच माझी बांसरी. त्या तुझ्या बांसरीनं आकाराला आलेले हे पाहा शब्दांचे थवेच्या थवे ! कसे या अंतराळांत नाचत राहिले आहेत. आतांपर्यंत जणूं हजारों शिंपल्यांत ते दडून बसले होते. तुझ्या गळ्यांतून निघालेल्या सुरांच्या स्पर्शानं ते शिंपले आतां साफ उकलले आहेत. त्यांतून शब्दांचीं मोतीं चमकूं लागलीं आहेत. तीं सुढाळ मोतीं वेंचून आतां कशी डौलदार गळसरी ओंवून देतों पाहा. ती तुझ्या गळ्यांत शोभेल. त्या मोत्यांचं तेज तुझ्या मुखावर फांकेल अन् त्या तेजानं डंवरलेल्या तुझ्या मुखश्रीकडे पाहून मला आणखी मोतीं गोळा करायाचा उल्हास दाटेल.

**गुणवती** : काय, काय म्हणतोस तूं हें ? दाखीव मला तीं सुढाळ मोतीं. गळसरींत ओंवण्यापूर्वी मला ती एकवार तळहातावर घेऊन पाहूं दे. आयता दागिना लेइण्याच्या आनंदाहून तो घडत असतांना लक्षपूर्वक पाहाण्यांत अपार आनंद आहे. त्या मोत्यांचं तेज माझ्या मुखावर फांकलं तर माझे डोळे दिपून जातील. ते दिपण्यापूर्वीच त्यांचं तेज मला डोळ्यांत भरून घेऊं दे. म्हणजे त्या भरल्या

डोळ्यांनीं मोतीं वेचणाराची उल्हासमूर्ती पाहून ती मला अंतरंगाच्या डबींत सांठवितां येईल.

**होना** : अंगावर हव्यासानं दागीना घालणं अन् तो घालावयास देणाऱ्याला कृतज्ञतेनं कांहीं मोबदला देणं, एवढाच स्त्रीमनाचा धर्म माझ्या ओळखीचा होता. पण दागीना घडवितांना पाहणं अन् देणाऱ्याचं रूप अंतरंगांत सांठविणं ह्या स्त्रीमनाच्या दुर्मिळ धर्माची तूं मला आज नव्यानंच ओळख करून दिलीस.

**गुणवती** : मला स्त्रीधर्म कळत नाहीं अन् तूं काय म्हणतोस हेंही कळत नाहीं. मला तीं मोतीं पाहाण्याचा अन् त्यांचं तेज डोळ्यांत साठवून ठेवण्याचा अनिवार सोस लागला आहे. किती अधीर करतोस मला. दाखीव रे मला तीं मोतीं.

**होना** : किती अधीर होतेस-वेचतांना सावधानता लागते, ओंवतांना त्याहूनही अधिक लागेत. ती तुझ्या या लागटपणानं ढळेल.

**गुणवती** : मग कशाला गोंवलंस मला या गळसरीच्या मोहांत.

**होना** : म्हणून काय पशापशांनीं ओट्यांत भरून घ्यायचे असतात मोतीं ? नाहीं. गळसरी कशी वेचक, एकजिनसी दाण्यांची झाली पाहिजे. तरच ती तुझ्या गळ्यांत शोभेल. तुला नुसताच गळसरीचा मोह. मला, ती तुला कशी शोभेल याचा.

**गुणवती** : मग माझा मोह आवरून तुझ्यासाठीं काय करूं मी ?

**होना** : एकेक. पारखून, पाणी जोखून मी एकेक देईन, तसतसा घे. आहे कां लहानपणची आठवण ? हिरकाडीची सुई अन् केळीच्या सोपटाचा दोरा. झाडाला धक्का न लावतां वाऱ्याच्या लहरीनं गळेल तें पारिजातकाचं एकेक फूल वेंचायचं अन् सुईंत खोंचायचं ! नेढं ओलांडून तें दोराच्या टोकाला पोंचविलं कीं पहिल्या-सारखंच गळून पडलेलं दुसरं फूल !

**गुणवती** : कसंकसं ?

**होना** : आधीं तुला मोतीं पाहायचे आहेत ना ? शब्दांचे ! तो पहा त्यांचा पोस ! कसा नजर तटे ऽ तिथवर तणावला आहे.

**गुणवती** ! कुठें रे ? मला तर कांहीच दिसत नाहीं अन् तूं काय म्हणतोस तेंहि कळत नाहीं. हें तुझं इंद्रजाल तर नाहीं ?

**होना** : वा ग ! माझं इंद्रजाल काय ? सृष्टी निर्माण करायला लावणारी माया ब्रह्माला असंच म्हणत असते. त्या ब्रह्मासारखा मी केव्हांचा इथें ताटकळत उभा

होतों. चकार शब्द माझ्या वाटेला फिरकत नव्हता. तितक्यांत तूं आलीस. अन् शब्दब्रम्हांडाचा डहुळा अचानकपणें सुरू झाला. मी गजबजून तुझ्या मुखाकडे पाहिलं, तो चकमकीनं ठिणगी पडावी तसा पहिला अस्फुट शब्द माझ्या डोळ्यांपुढून चमकून गेला. तरी देखील त्याच अस्फुटतेंत मी आंधळ्यासारखा चांच-पडत होतों. मग तुझ्या गळ्याची बांसरी सुरू झाली. ती ऐकत असतां माझ्या मनाचे पीळ एकामागून एक मोकळे होत चालले. अन् ही शब्दांची बिछायत पघळत पघळत क्षितिजावेरी पोंचलेली मला दिसली. मग आतां सांग पाहूं कुणाचं हें इंद्रजाल ? तुझं कीं माझं ?

**गुणवती** : तें कसं सांगूं मी इतक्यांत ! तू जेव्हां एकेका शब्दाची फेक करशील, तेव्हां ते पशापशानें जरून माझ्या ओय्यांत ओथंबतील—तेव्हां मला कळेल. मग थांबलास कां आतां ?

**होना** : दृष्टीच्या टप्प्यांत नव्हतं तोंवर अभावाची रुखरुख होती. आतां अवघी शब्दसृष्टी माझ्या दृष्टीच्या आटोक्यांत आली आहे. रुखरुख संपून हुकुमतीचा आनंद फेसाळतो आहे. तो मला अनुभवूं दे क्षणभर ! दृष्टीच्या आवारांत गजबज-लेला बाजार पाहून घेऊं दे मला !

**गुणवती** : समजल्यें. ही तुझ्या चाळकपणाची सारी कुसर मी समजल्यें. बांस-रीचा वेधक सूर वनांत निनादूं द्यायचा अन् नादावलेल्या गोपी धांवत आल्या कीं बांसरीला मुकेपणाची म्होरकी घालायची. असा आहेस तूं चित्तचाळक !

**होना** : कोण करायला लावतं हें ? माया ! मायेच्या रूपानं आलेली तूं. तूं करा-यला लावतेस हें !

**गुणवती** : लावतें ना ? मग कर पाहूं माझंच रूप ! तुझ्या शब्दांच्या ऐन्यांत मी कशी दिसेन हें तरी कळेल मला.

**होना** : तुझं रूप करूं ? आतां काय त्याला उशीर ! सखे गुलेअनार !

**गुणवती** : गुलेअनार ?

**होना** : गुलचमन—

**गुणवती** : हें माझं रूप ? माझ्याकडे पाहून कांहींतरी म्हटल्यानं माझं रूप होतं कीं काय ?

**होना** : निशीवा रमण !

**गुणवती** : वा ! कशास काय संबंध !

**होना** : तें कसं कळणार तुला इतक्यांत ? सबंध गळसरी होईपर्यंत ती तुटकीच वाटणार ! फार लांब कशाला ? तूं आहेस कशी, हें तुला तरी कुठें माहीत आहे ?

**गुणवती** : कां बरं ? मी रूपवती आहे.

**होना** : अत्रांतर बायकांसारखं बोलूं नकोस.

**गुणवती** : तें कसं ? मी नाहीं रूपवती ?

**होना** : कशावरून ?

**गुणवती** : आरशाच्या साक्षीनं.

**होना** : पण तें ठरविणार कोण ? तूंच ना ?

**गुणवती** : कां ? मीच कां ? लोकांच्या डोळ्यांनीं तें केव्हांच ठरविलं आहे.

**होना** : म्हणजे तुझ्या रूपाचं मान तूं ठरवीत नाहींस. ठरवितात लोक. असंच ना ?

**गुणवती** : ( फुरंगटून ) हो असंच !

**होना** : म्हणजे काय होतं माहीत आहे ? लोकांच्या दृष्टीत तुझ्या रूपाचं बिंब उमटतं अन् त्यांना चटका लावतं. तो चटका त्यांच्या दृष्टींत उचंबळूं लागला म्हणजे तुला प्रचीती येते तुझ्या रूपाची. एरवी नाहीं. होय ना ? मग तूं मेहरपीच्या बांकदारपणानं म्हणतेस कीं मी रूपवती आहे.

**गुणवती** : पण माझं रूप केवळ माझ्या चेहऱ्यांतच कांही एकवटलं नाहीं. तें माझ्या चालण्या-बोलण्यांत अन् हसण्या-मुरडण्यांत ओतप्रोत भरलं आहे. आंधळ्यानं माझं हंसणं-बोलणं ऐकावं अन् बहिऱ्यानं माझं चालणं-मुरडणं पाहावं, तरी ते म्हणतील—

**होना** : तरी तेच म्हणतील अन् तेंच तूं मानून चालशील. पण तुझ्या रूपाची ऊणखूण तुझ्याजवळची कोणती ?

**गुणवती** : मी रूपवती आहे ही जाणीव. ती माझ्या अंगमोडींत अन् नेत्रकटाक्षांत पाऊलागणीक उमटत असते.

**होना** : मग ही जाणीवच नडते आहे तुला. माना वेळण्याचा कबूतराचा डौल अन् पाय उचलण्याची मोराची ऐट-असते कां जाणीव त्यांना, आपल्या डौलाची नी ऐटीची ?

**गुणवती** : असं होय ?

**होना** : अन् म्हणे मी रूपवती !

**गुणवती** : मग मी रूपवती नाहीं, असं कां म्हणायचं आहे तुला ?

**होना** : तुझ्या रूपाचं अपरूप माझ्या नेत्रांत आहे. लोकांच्या नेत्रांत आहे. तें तिथें नसेल तर अंधेरांत तेवणारी ज्योत अंधेरमयच !

**गुणवती** : बरं बरं ! मी नाहीं जा रूपवती.

**होना** : असा रुसवा करूं नकोस ग. संध्याकाळच्या ढगासारखी रंग पालटूं नकोस. ऐक तूं कशी आहेस तें ! निशीचा रमण तसा गोजिरा तुझा मुखवटा.

**गुणवती** : आतां माझी कांहीं तरी समजूत घालतोस काय ?

**होना** : नव्हे ग. मी म्हणतों तशीच आहेस तूं. कशी ? सखे गुलेअनार, गुलचमन, निशीचा रमण तसा गोजिरा तुझा मुखवटा.

[ गुणवती या शब्दांचा क्षणभर विचार करिते. ती ते शब्द हलक्या सुरांत म्हणतेही. त्यांतील अर्थाची प्रसन्नता अनुभवून आनंदानें हंसते. स्वतःच्या रूपाचा पर्याय शब्दांत व्यक्त झालेला पाहून ती त्या कल्पनेंत रमून जाते आणि स्वत्व विसरते. तथापि तिच्या ओंठावर रेंगाळणारें हंसणें अडविलेल्या पाण्याप्रमाणें खोळंबून राहिलें आहे. ]

**होना** : कां हसलीस ?

**गुणवती** : तुझ्या शब्दांत मी माझं रूप पाहिलं अन् तें मला फार आवडलं.

**होना** : असं असं ! म्हणून तुझ्या कंठांत हसण्याचं चांदणं फुटलं होय ?

**गुणवती** : माझ्या हसण्याला चांदणं म्हणतोस अन् मुखवट्याला निशीचा रमण म्हणतोस, यापरता माझ्या रूपाचा राजहंस आणखी चंदेरी फेस तो काय उधळणार ! मग मी रूपवती नाहीं, असं माझ्या मुखांतून कां वदविलंस ?

**होना** : तूं रूपवती नाहींसच. आपण रूपवती आहों, असं तूं आपल्या तोंडानं म्हणूं लागलीस, नव्हे, नुसतं मनांत आणलंस तर त्या रूपाची खुमारी मोडली, नष्ट झाली. फुलाला कधीं वाटतं कां आपण रंगदार आहों म्हणून ? कस्तुरी कधीं सांगते कां आपण सुगंधी आहों म्हणून ? अन् कोकिळा कधीं म्हणते कां आपण सुरेली आहों म्हणून ? आपापल्या गुणांची जाणीव नसणं हेंच खरं लावण्य.

**गुणवती** : असं होय ?

**होना** : मघाशीं तूं मला आळवीत होतीस—वाजवि तव बांसरी.

**गुणवती** : पण तूं कांहीं वाजविली नाहींस.

**होना** : तेंच बरं झालं. कारण तुझ्या गळ्याच्या बांसरीपुढें या कळकाच्या बांसरीची काय प्रतिष्ठा ! कारण तुझ्या—कंठामधिं कोयळ मधुर बोलणें रंग गोरटा.

**गुणवती** : माझा ?

**होना** : होय तुझा. पाहा आतां माझ्या शब्दांच्या ऐन्यांत तुझ्या रूपाचं बिंब–त्या शब्दांच्या कल्पनेंत बघ, माझ्या नेत्रांत बघूं नको.

**सखे गुलेअनार, गुलचमन, निशीचा रमण तसा गोजिरा तुझा मुखवटा ।**
**कंठामधिं कोयळ मधुर बोलणें रंग गोरटा ॥**

[ हें तोंड गुणवती म्हणते. त्यानंतर तो तिच्याकडे पाहात कवन रचूं लागतो. गुणवती त्याच त्या ओळी आपल्याच नादांत म्हणत आहे. कांहीं वेळानंतर— ]

**होना** : आतां तुझं रूप साकल्यानं करून दाखवितों, तें ऐक—

**बांधिव बुचड्याची लपक, पदर अति सुबक खोविला तिपदरी वेणीचा ।**
**चंदन डहाळीस लपेटा जसा काळ्या नागिणीचा ॥**

**मुलतानी भवया कशा कमाणा जशा, बहार मधिं कुंकाचे टिकलीचा**
**नरम ओठ पोवळे, तुझा नासाग्रीं झोंक नथणीचा ।**
**कंबर बारिकसी बुंद, छातिमधे रुंद, सडक बांधा नाजुक देहीचा ।**
**लाजुन बम्सिल दूर, पदर शिरीं, सरसाऊन युक्तिचा ।**
**नैनाचा करी झोंक, जराशी नोक, कळे न कळे फिरवशी पटा ॥ १ ॥**
**सखे गुले अनार ॥ ध्रु० ॥**

[ ही लावणी म्हणण्यांत दोघेंही रंगून गेलीं आहेत. शेवटची लकेर मारून होना लावणी संपविणार तोंच बाळाची हांक ऐकूं येते. ती ऐकतांच दोघेंही भानावर येतात आणि त्यांचें गोकुळ पर्वतीच्या रानांतच विलीन होतें. ]

[ पडदा ]

: २ :

## प्रवेश पहिला

[ कांहीं वर्षांनंतर शुक्रवारांतील बावनखणी. गुणवतीचा दिवाणखाना. हा एखाद्या प्रतिष्ठित कळावंतिणीच्या थाटाला साजेसा असून छतावरून लटकणारीं हंड्याझुंबरें आणि लोडतक्क्यांच्या बैठका. एका अंगाला गाण्याची बैठक आणि दुसऱ्या अंगाला आल्यागेल्यांची. गाण्याची बैठक आहे त्या बाजूनें आंतील दरवाजा असून आल्या-गेल्यांच्या बैठकीमागें बाहेरून येण्याचा दरवाजा.

बाळा कारंजकर गुणगुणत बाहेरच्या दरवाज्यानें येतो. दिवाणखा-न्यांत होनाजी, गुणवती अगर यमुना यापैकीं कोणीतरी अथवा तिघेही असतील ही त्याची अपेक्षा. पण दिवाणखाना रिकामा पाहून त्याला आश्चर्य वाटतें. तथापि आंतपर्यंत चौकशीला न जातांच तो गुणगुणत येरझारे घालूं लागतो नंतर तेंच गुणगुणणें तो मोठ्यानें म्हणतो—]

**बाळा** : होनाजी—बाळा कविराज कवीश्वर म्हणे।

**यमुना** : ( आंतून प्रत्युत्तरादाखल ) मेल्या म्हणतोस तरी काय ?

**बाळा** : ( ही आपलीच संभावना समजून मान वेंळीत ) हंसणें, रुसणें हीं प्रीतीचीं लक्षणें।

**यमुना** : ( पोपटाचा पिंजरा हातीं घेऊन आंतील दरवाजानें बाहेर येते. ) उडून जाण्याचीं भिकारी लक्षणं मेल्याचीं.

**बाळा** : ( हा उद्गार पोपटाला उद्देशून असल्याचे लक्षांत येऊन हंसत ) रहाणार अक्षयीं पुणें, देश दक्षिणे !

**यमुना** : ( रस्त्यावरील खिडकीकडे जातांना पण बाळाकडे न पाहतां ) खुशालींत राहावं, पेरू–डाळिंब खावं, गोड गोड बोलावं—

**बाळा** : कुणासारखं ? ( कडीला पिंजरा अडकवीत वळून पाहाणाऱ्या यमुनेस ) मालकिणीसारखं. बोलेल यमुनाबाई, बोलेल आत्ताशीक कुठें रानांतून आलाय. जरा नव्याचा जुना झाला कीं शिकवाल तें बोलेल. अगदीं मिठ्ठास. गाईलसुद्धां ! म्हणेल, बहुतां दिसां अ'ला घराशीं, घ्या पानाचा विडा। सखया राग मनींचा सोडा ॥ आँ ? ही कुणाची लकेर ?

[ या पुढील संवादांत अशा लकेरी अधून मधून ऐकूं येतात. ]

**यमुना** : ही,—तुझ्या होनाची.

**बाळा** : ( तोंच दुसरी लकेर ऐकून ) अन् ही ?

**यमुना** : सादाचा पडसाद. ही माझ्या गुणवतीची. बसलेत दोघं मागच्या माडींत,—लावणीची तोड–जोड करीत.

**बाळा** : धंदा उजगारीला आणायचा म्हणजे बसायलाच हवं. ठाण मांडून बसायला हवं–कसं ? हंस बसे हंसी शेजारीं। अन् काय करी ? मोतीचारा घाली मुखांतरीं ॥ ( यमुना चमकून पाहते ) मोती-चारा शब्दांचा, बरं कां यमुनाबाई !

**यमुना** : ( मान वेळीत ) असं, असं ! मोती-चारा शब्दांचा, पण गोडवा लागतो गळ्याचा, बरं कां बाळाभाऊ !

**बाळा** : अन् त्या गळ्याचं मोल चढतं कशानं ? होनाच्या शब्दानं, त्याच्या रस-भरी कवनानं ! नाहींतर धृपद-धमाराच्या मैदानांत ताल-सुराच्या टकरा चालल्याच होत्या. चालल्या होत्या कीं नाहीं या रिकाम्या लोड-तक्क्यांपुढें ?

**यमुना** : ( गंभीरपणानें ) धृपद-धमार ! घराण्याचं गाणं आहे तें, बाळा. गंडा-बांधून शागीर्दी केली आहे त्यासाठीं.

**बाळा** : खूब केली असेल, कसून केली असेल ! ऐकून कोण घेणार ? ते भले भले गुलमुच्छावाले उस्ताद बसलेच आहेत पखवाज घुमवीत !

**यमुना** : गळ्याचा गोडवा त्यांना कुठून येणार, बाळा ?

**बाळा** : अहो यमुनाबाई, नुसता गोडवा नाहीं काम देत. वाऱ्यावर विरून जातो. मग ती गुलबदन कळावंतीण असली म्हणून काय झालं ! ऐकणारा थिरून

जातो टप्प्याच्या लावणीनं, अन् ती म्हणावी लागते होनाजीच्या ढंगानं ! कशी ? म्हणे होनाजी–बाळा हा संकल्प रचेला । तुम्ही चला राजमंदिरीं म्हणून धरते शेला ॥ शेला कां धरते माहीत आहे कां ? तुजवर आपला कुरबान् प्राण म्यां केला । असं आर्जवानं म्हणावं लागतं, अन् मुरडून बघावं लागतं.

**यमुना** : असं काय ? आल्यापासनं बघते आहे, फारच पिकलाय् रे तुझा गळा आज.

**बाळा** : कां नाहीं पिकणार ? काढले पुष्कळ दिवस पड खाऊन, पेंढा भरल्यागत ! तोंड काढायला जागा नव्हती, सोयरीक मोडल्यागत. पण आतां होनासारखा शाहीर मिळाला, आमचा फड उभा राहिला, लोकांत बोलबाला झाला ! आतां लोक काय म्हणतात माहीत आहे का ?

**यमुना** : काय ?

**बाळा** : होनाजी–बाळा, गुणा आगळा, पृथ्वीवर विरळा । जाऊन पुसा त्याशीं अंतरींच्या कळा ।

**यमुना** : कोण लोक रे हे ? चौचाल कुठचे ! चवपालटीसाठीं कांहींही चरबट चालतं त्यांना !

**बाळा** : नाहीं चालत यमुनाबाई, नाहीं चालत बरं ! चालतं तर तो माणदेशी तमाशा दरसाल फाल्गुनाची वारी करून माघारी कां जातां ! चरबटपणाची खैरात काय कमी करतोय तो ? पण होनाच्या डफापुढं ढोलकीचा गजरा सैल करून जातो. ढेकळावर तिफण मारल्यागत भुइ-सपाट होतो. कां ? तर रसिकांचे वर्म जाणे कोण ?

**यमुना** : एका होनाजी बाळावांचून, असंच म्हणायचं आहे ना तुला ?

**बाळा** : अलबत्

**यमुना** : समजल्यें, समजल्यें.

**बाळा** : अशी वेठीची मान नका तुकवूं. होनाचा अस्कराच असा आहे कीं, त्यानं एक गुणें शब्द बोलावा, तो ऐकणारानं चौगुणानं ऐकून घ्यावा.

**यमुना** : फार ऐकली रे तुझ्या शब्दाची सुराणी.

**बाळा** : नुसत्या शब्दाची काय म्हणतां ? शब्दांची ओवण केलेल्या लावणीची असं म्हणा.

**यमुना** : ( किंचित् उपहासानें ) लावणी !

**बाळा** : कां ? अजून घराण्याच्या गाण्याचा पोकळ ताठा डांचतो आहे वाटतं ! पण यमुनाबाई, लावणी आतां ढोलकीच्या झांगडींतून डफ-तंबोरीच्या तालसुरांत आली आहे. मुताडा वाण टाकून धनवडी पैठणी नेसूं लागली आहे. चरबटपणाचा जल्लोश सोडून दिवाण-दरबारीं वावरूं लागली आहे. होनाची लावणी श्रीमंतांनीं आदरून बोलाविली अन् आतां ती सरदार-दरकदारांच्या सदरेवर मिजाशींत जाऊन बसली आहे. इतकं कशाला, तुमच्या गुणवतीच्या बैठका आतां रंगतात कशानं ? घराण्याच्या गाण्यानं नव्हे, होनाच्या मुरेल्या लावणीनं !

**यमुना** : पण माझी गुणवती तुझ्यासारखी बकाल-बुणग्यांपुढें नाहीं म्हणत ! अं हं ! इतकी पायरी उतरली नाहीं ती ! गुणवती म्हणते मातबर लोकांपुढें !

**बाळा** : पण म्हणते लावणीच ना ? यमुनाबाई, गोष्ट अशी आहे कीं, घोड तेंच; पण सामान लादलं कीं ओझ्याचं अन् खोगीर घातलं कीं स्वारीचं. सरदार-दरकदार मंदील घालून या असल्या दिवाणखान्यांत बसतात, अन् बकाल-बुणगे डोईवर मुंडासं ठेवून भुईवर टेकतात. पण ऐकतात लावणीच-होनाजीबाळाची.

**यमुना** : खूब दिसतोस रे चातुरीचा बोलणारा तूं ?

**बाळा** : नव्हतों कधीं ? पण यापूर्वी खडकावर पाऊस पडला अन् वायां गेला. आतां तो पिकाऊ रानांत पडला म्हणून गहूं-हरबरा पिकला. होनाची अन् गुणवतीची मिळणी झाली पाहिजे असं कोण म्हणत होतं ? त्यासाठीं अवशीं-पहाटें खेटे कोण घालीत होतं ? विचारा त्या झिजलेल्या उंबऱ्याला !

**यमुना** : सगळं खरं बाळा. पण मोत्याची गळसरी टाकून वाकाची दोरी कशी बांधावी, असा विचार पडला.

**बाळा** : अन् आतां ? वाकाच्या दोरीऐवजीं सहापदरी जवाची माळ, कोण घालतं ? मी ? यमुनाबाई, घराण्याचं गाणं स्वतःसाठीं, अन् लावणीचं,—लोकांसाठीं !

**यमुना** : आतां उमजलं तें ! पण म्हणतात ना, कुणाचा कोण अन् पितळेचा होन.

**बाळा** : पितळेचा नव्हे, जडावाचा. लखलखीत सोन्याचा.

**यमुना** : तो झाला आतां ! पण तेव्हां होता गवळ्याच्या गोठ्यांतला ! अन् तो देखील आईच्या चौकी-पाहऱ्यांतला !

**बाळा** : रानांत नव्हता ना चौकी-पाहरा ?

**यमुना** : नव्हता. पण बाणींत आलेल्या तरण्या-ताठ्या पोरीला कुणाच्या भरंवशा-वर पाठवायची रानांत ?

**बाळा** : कां ? मी जिम्मेदार नव्हतों वाटतं ? अन् अखेर नेली कुणी ? मीच ना ? पदराखालून दिवा न्यावा, तसा लोकांच्या नजरेचा वारा चुकवून ? अन् मी नसतों तरी महादेवासारखा नवरा हवा, तर पार्वतीसारखं रानांतच जायला हवं.

**यमुना** : रानच कशाला ? गुणवतीच्या थोर नशिबानं घर बसल्या चालत आला आहे तो.

**बाळा** : कोण होना ?

**यमुना** : नव्हे, सरदारांचा-मुलगा.

**बाळा** : उदाजीराव होय ? कळली त्याची कुळकथा आमच्या पुराणिकबुवांकडून.

**यमुना** : मोरशेटजींच्या निसबतीनं आलाय तो. स्वारीचा उमदा रंग पहिल्याच बैठकींत खरकून गेला.

**बाळा** : गाण्यानं ?

**यमुना** : कशानं तें काय बोलून दाखवायला हवं ? त्यानंतर गर्भाधानाच्या निमित्तानं ओटभरणाचं बोलावणं आलं, तेव्हांच मी ओळखलं. इभ्रतीनं सरदार नी दौलतीनं पैकेपूर.

**बाळा** : बापकमाईची दौलत.

**यमुना** : कुणी कां कमावलेली असेना. आमची नजर घराण्याच्या दौलतदारीवर.

**बाळा** : हें झालं कळावंतिणीच्या जातीचं बोलणं. पण गुणवतीची नजर कळा-वंतिणीची नाहीं.

**यमुना** : मग कशाची ?

**बाळा** : तिला आहे गुणाची कदर.

**यमुना** : ती ओसरेल तरुणपणाबरोबर. बाळा, रूप कांहीं हयातभर खोळंबून राहात नाहीं.

**बाळा** : रूप राहात नाहीं, गुण राहतात. यमुनाबाई, गुणवतीचा गळा असल्या छपन्न सरदारींवर झेंडा लावील, इतका अनमोल आहे. तो तुम्ही लुंग्या दौलत-दारीवर भाळून मानिमोल करणार काय ? तुम्ही तिची आई म्हणवितां. पण मला नाहीं वाटत, तुम्ही तिला नीट पारखली आहेसं !

**यमुना** : कशावरून रे ?

**बाळा** : तुम्ही तिच्या रूपाचा सौदा केला. काळजाचा कानोसा नाहीं घेतला.

**यमुना** : तो कसा काय ?

**बाळा** : ओटभरणाच्या निमित्तानं रंभाजीरावांनीं गुणवती पाहून घेतली, अन् उदाजीरावाला कळावंतिणीची मुभा दिली—

**यमुना** : अन् मी त्यांची सरदारी पाहिली, अन् मोरशेटजींकडून त्यांच्या तालेवारीची शहानिशा करून घेतली.

**बाळा** : येथवर ठीक झालं. पण सरदारीचा मर्तबा तुमच्या मानाला पुरवत असला, तरी गुणवतीच्या मनाला येतो कीं नाहीं, याची केलीत कां चौकशी ?

**यमुना** : असं होय ? ती करतांना सरदारीचा चौकडा गमवायला मी राजी नाहीं.

**बाळा** : त्या चौकड्यांतले मोतीं खरे-खोटे ठरण्यापूर्वीच ?

**यमुना** : ठरायचं काय त्यांत ? भापकरांची सरदारी कांहीं डेंगळेपाटलांसारखी काल पेरून आज उगवली नाहीं ! ती थोरल्या रावसाहेबांपासून शर्थीच्या मनसुब्यांनीं पोसलेली आहे.

**बाळा** : डेंगळे पाटलांनीं आम्हांला आसरा दिला म्हणून त्यांच्या सरदारीची चहादारी करायचं आम्हाला कारण नाहीं. उद्यां त्यांच्या वाड्यांतला एक कोपरा सुटला, तर दुनियादारी करायला आमची डफ-तंबोरी खंबीर आहे. डेंगळे पाटलांची कुचाळी करून भापकरांची सरदारी तालेवार ठरत नाहीं.

**यमुना** : ती जिम्मेदारी मोरशेटजींनीं घेतली आहे. महाल-मुलुखांच्या वरातांवर हजारों रुपयांचा ऐवज ते जसे श्रीमंतांना देतात, तसा तो भापकरांनाही देत आले आहेत. अन् मोरशेटजी म्हणजे कोणी सोनार-झारेदार नव्हत. श्रीमंतांच्या दरबारीं देवघेव करणारे मातबर सावकार आहेत.

**बाळा** : ते खूब कुबेर असतील. सावकारीचा पैसा हातबदल्यानं आपसुख बाळसं धरतो, तशी सरदारीची तलवार धरीत नाहीं. सरदारी, मनगटांत रग असेल त्याची. मुलुखगिरी, करील त्याची. रंभाजीरावांची रग उदाजीरावांत नाहीं अन् पूर्वीची मुलुखगिरी आज राहिली नाहीं. उदाजीरावांची आजची सरदारी मुलुखगिरी ऐवजीं उचापतीच्या झाडपाल्यावर शेरडीसारखी तोंड चालविते आहे.

**यमुना** : कांहीं असलं तरी सरदारांच्या कुळींतला आहे तो.

**बाळा** : उदाजीराव ना ? आहे. पण तोच एक नाहीं. रंभाजीरावांना दुसऱ्या बायकोचे सात मुलगे आहेत. उद्यां त्यांच्या पश्चात् सरदारीची पत्रावळ उऱगडली, तर उदाजीरावांच्या वाटयाला एक पान तरी येईल कीं नाहीं याची शंका आहे. हातांत भाला अन् मला जेवूं घाला, अशानं कुठें सरदारी होते काय ?

**यमुना** : कां रे, सरदारीचं सुइणपण केल्यासारखं बोलतोस तो !

**बाळा** : कशाला हवं सुइणपण ! उघड्या सोप्यावरच्या गोष्टी आहेत या. श्रीमंतांची नजर वांकडी झाली कीं सरंजामाच्या जप्त्या होताहेत रोज. उद्यां तीच पाळी उदाजीरावांवर येणार नाहीं कशावरून ?

**यमुना** : थेट श्रीमंतांच्या खलबतखान्यांत रिघाव झालाय वाटतं तुझा ?

**बाळा** : वसईनंतर श्रीमंतांचा खलबतखाना उमद्या चालीचा राहिला नाहीं. कुणाची हुंडी चढवायची अन् कुणाची उतरायची, असलीं घराऊ खलबतं चालतात म्हणे तिथें. अन् त्या खलबताचे सूर घरभेदे संगमावर जाऊन साहेबाच्या बंगल्यांत उठवितात. सांगा उदाजीरावांना, श्रीमंतांची चाकरी सोडून आल्पिष्टण साहेबाचं कुडतं धरायला.

**यमुना** : म्हणजे माझी अक्कल आटली अन् तुझी वाहावत चालली कीं काय ?

**बाळा** : काय करणार ? जातीचा शिंपी अन् हाडाचा तमासगीर पडलों ना ! लोकाचार पाहून अन् चालू घडीचा कानोसा घेऊन कवनं करायची आदत लागली, ती तोंड बांधून स्वस्थ बसूं देत नाहीं.

**यमुना** : बरं तर घेतेच मोरशेटजींकडून शहानिशा करून.

**बाळा** : जरूर घ्या. नुसत्या सरदारीच्या घोळदार अंगरख्यावर जाऊं नका.

**यमुना** : अंगरख्यावर ?

**बाळा** : होय. उदाजीरावाचा अंगरखा आहे सरदारीचा, पण त्याचा घोळ आहे बकाल-बुणग्यांचा.

**यमुना** : पण त्यानं केलेली ऐवजाची देवाण सरदारीला साजेशीच आहे.

**बाळा** : असेल. इभ्रतीला साजेशी आहे की नाहीं, एवढाच प्रश्न आहे.

**यमुना** : आमची काय सोयरीक आहे थोडीच. सरदारीच्या दर्शनी मेहेरपीपुढें इभ्रतीचं झालरदार छत झाकून जातं.

**बाळा** : ती दर्शनी मेहरप तुम्हां-आम्हांला, छताखालीं नांदायचं आहे गुणवतीला. ती तुमची मुलगी म्हणूनच कळावंतीण म्हणायची. पण अवांतर कळावंतिणीसारखं काळीज कोनाड्यांत ठेवून ती वावरत नाहीं.

**यमुना** : कां रे बाबा, तिचं काळीज मुठींत असल्यासारखं बोलतोस तें !

**बाळा** : मुठींतच लागत नाहीं, यमुनाबाई. सराइताला मखमलीची लव नजरेनं उमगते, अन् सोनकेळयाची जात सालीवरनं समजते.

**यमुना** : ती कशी काय ?

**बाळा** : हें मी सांगायला हवं ? होनाजीच्या संगतींत गुणवती कशी उमलते, अन् उदाजीरावाला पाहतांच कशी कोमावते, हे पाहिलं आहे कां कधीं ?

**यमुना** : आलं लक्षांत तूं काय म्हणतोस तें. रंगाऱ्यानं काढलेलं चित्र ओलं असतं तोंवर चमकतं, सुकल्यावर थिजून जातं.

**बाळा** : ओला रंग धुवून निघतो, सुकल्यावर पक्का होतो. तसा तो होनाच्या बाबतींत पक्का झाला आहे, यमुनाबाई.

**यमुना** : काय बोलतोस हें भलतंच !

**बाळा** : खरं तेंच बोलतों.

**यमुना** : तूं केलंस हें.

**बाळा** : होय. पण तुमच्या पसंतीनं अन् तुमच्या सांगण्यावरनं. तरी देखील मला उभयतांचा स्नेह टिकवायचा आहे. तुमचा अन् होनाचा. अशा स्थितींत होनाच्या ओढीनं गुणवती उदाजीरावावर उदास झाली, तर बोल लावाल मला. म्हणाल, मी केली फुसलावणी. अन् तो राग काढाल होनावर. होनाचा अपमान कराल या घरांत. तें मात्र चालणार नाहीं. मानाचं पान मानानंच राहिलं पाहिजे.

**यमुना** : गोष्टी या थराला आल्यावर सांगतोस काय ?

**बाळा** : गुणवतीबद्दल ? मी काय सांगायचं त्यांत ? ती मुलगी तुमची. तुम्ही काय ओळखीत नाहीं तिला ?

**यमुना** : तुम्हां तिघांचं बेलपान मला कसं कळावं !

**बाळा** : कां बरं ? जें कांहीं चालतं, तें या घरांतच चालतं ना ? होनाला नीट पाहिलंही नव्हतं तेव्हांपासून त्याच्या शब्दानं अन् सुरानं गुणवतीला वेध लागला होता. होना सरदार नाहीं कीं दौलतदार नाहीं, हें काय तिला माहीत नव्हतं ? पण सुगर जाणे सुगरावा !

**यमुना** : तो खानदान असेल तर ! भिकेच्या शिकाळीचा सुगरावा काय कामाचा ?

**बाळा** : सुगरावा खानदानपणासाठीं अडून बसत नाहीं, यमुनाबाई. छेलबटाऊ अन् मोहनाराणीचं चरित्र आमदाबादेंत होतं, तें काय पुण्यांत होणार नाहीं ? तुम्ही बसलांत सरदारीची कनात उभारून; पण पहा एकदां पलीकडे डोकावून. म्हणजे कळेल, जोडी संगीन उभयतां दिसे, जशी कां बटाऊसंगें मोहना।

**यमुना** : कुणाची जोडी ?

**बाळा** : ती, मागच्या माडींत बसली आहे ती !

**यमुना** : ती फोडायला किती उशीर !

**बाळा** : फोडा खुशाल. मला साधायचं तें मी कधींच साधलं. आतां फोडून नुकसान होईल तुमचं.

**यमुना** : तें कसं ? तुमच्या लावणीच्या गाण्यानं सरदारीचा संबंध नाहीं जुगला !

**बाळा** : तो आमच्या लावणीच्या गाण्यानं नाहीं, तसा तुमच्या घराण्याच्या गाण्यानंही नाहीं. तो जुगला आहे गुणवतीच्या रूपकळेनं अन् तेंच तुम्ही आपलं धन समजतां. पण तें जाईल दुपारच्या सावलीगत चार घटकांत कलतं होऊन.

**यमुना** : त्या चार घटकांतच साधीन मी देखील. कळावंतिणीचा उंबरा चढलेला पुरुष बिनखोट सुटत नसतो, हें विसरलास वाटतं ?

**बाळा** : तें नाहीं मी विसरलों. पण गुणवतीचा सगळा जीव गाण्या-नाचण्यांत गुंतला आहे, तसा कळावंतिणीच्या कसबांत नाहीं, हें तुम्ही मात्र विसरलां. गुणवती होनापुढें कळावंतीण म्हणून वागत नाहीं.

**यमुना** : मग कशी ?

**बाळा** : सांगूच कां आतां ?

**त्वां सजणारे कशी लाविली माया।**
**अर्पण तुम्हांसी केली माझी काया।**
**तुमची आमची जाहली इमान-क्रिया।**
**झड घातली म्यां बळकट तुमच्या पायां।**
**तुप-साखर भात नित्य वाढिन जेवाया।**
**अंतरूं नका मज स्वामीराया।**

**यमुना** : इतकी कशाला पाहिजे त्याची छाप ?

**बाळा** : एवढ्यानंच काय झालंय. गुणवती पदर पसरून म्हणते—

**धन संपत हा जीव–प्राण, करिन कुर्बान।**
**तुम्ही सजण सुजाण, घ्या आदराचें पान।**
**मज दुबळीचा राखा स्वामी तुम्ही मान।**

**यमुना** : वा ! ही कोण झाली एवढी मुख्त्यारणि जीव–प्राण कुर्बान करायला ! अन् मला पुसल्याखेरजि इमान–क्रिया करते कशी अन् कुणाशीं ?

**बाळा** : अशा गोष्टी कुठें वार्जीपुशीनं होत असतात काय, यमुनाबाई ? अहो, इष्काची लागली चटक अन् करून घेतली अटक. भुंगा रुंजी घालूं लागला म्हणजे कमळण काय मिटून राहते होय ?

**यमुना** : अरे वा ! रुंजी घालतोय ? तो काय तळ्यांतली बेवारशी कमळण समजतो काय गुणवतीला ? आईसारखी आई मी ! इथें अशी राखणीला बसले असतांना—

**बाळा** : आतांदेखील बसलांच आहां.

**यमुना** : पुरे कर. होना मोठा शाहीर झाला, म्हणून कोणी सरदार होतो कीं काय ? बाळा, भापकरांशीं जुळत आलेला संबंध तोडायला मी तयार नाहीं, असं होनाला बजावून सांग.

**बाळा** : मी कां सांगेन ? आधींच मी त्याला देवघरांतून कळावंतिणीच्या दिवाण-खान्यांत आणलाय—

**यमुना** : तें तुझ्या पत्रावळीवर तूपसाखर पडावी म्हणून.

**बाळा** : माझ्याच कां, तुमच्याही. आतां तुम्हांला सरदारीच्या साखरभाताची चटक लागली ही गोष्ट वेगळी.

**यमुना** : मग गोष्टी भलत्या थराला जाऊं लागल्यावर तूं नाहीं आवरणार होनाला ?

**बाळा** : मी होनाला आवरण्यापेक्षां तुम्ही गुणवतीला कां आवरीत नाहीं ? आपल्या शेताची कुपाटी आपण दुरुस्त राखावी.

**यमुना** : ऐनवेळीं असा अंग झटकून मोकळा होतोस काय ? ही रीत नव्हे बाळा.

**बाळा** : गुणवती मुलगी तुमची, तसा होना माझा कोण लागतो हो ? कोण्या रीतीनें मी त्याला आवरावं म्हणतां ? त्यांतून तो आतां गुरं वळणारा गवळी राहिला

नाहीं. त्याच्या शाहीरीचा लौकिक भीमथडींत गाजतो आहे. त्याच्या रागदारीच्या लावण्यांवर श्रीमंतांची रीझ आहे. तुमच्या वांकड्या शब्दानं तो दुखावला तर दुसरी कोणतीही कळावंतीण तो हातीं धरील अन् आपल्या लावण्या म्हणवील. होईल काय कीं गुणवतीनं घुलकावीत आणलेलं घोडं उधळून जाईल. मग गुणवतीचा लगाम जाईल दुसरीच्या हातीं अन् ती बसेल रित्या हातीं.

**यमुना** : असं नाहीं होऊन चालायचं. इतकं झालं तसं गुणवती श्रीमंतांपुढं रुजू झालीच पाहिजे.

**बाळा** : मग ती होनाच्या निसबतीनं होईल कीं उदाजीरावाच्या ?

(यावेळीं सरदार भापकरांकडील कारकून चांचपडत दरवाजांत येतो. भांबावलेल्या मुद्रेनें आंत डोकावतो. उपरणें तोंडावरून फिरवतो. त्याच्या काखेंत बासन आहे, तें तो सांवरतो. कळावंतिणीच्या घरीं येण्याची त्याची पहिलीच वेळ असावी, इतका तो घोटाळतो. बाळाची नजर त्याच्याकडे जाते. तेव्हां तो दोन पाऊलें पुढें होऊन विचारतो ) कोण ?

**कारकून** : ( पुढें होऊन चांचरत ) पारनेरकरीण यमुनाबाई ?

**यमुना** : हो हो, मीच ती. आपण कोण ?

**बाळा** : ( आणखी दोन पाऊलें पुढें जाऊन ) आपण कोणीही असा, पण पारनेरकरीण यमुनाबाई त्या याच.

**यमुना** : कोणाकडून आला ?

**बाळा** : कोणाकडे आला हें ठरलं, आतां कोणाकडून आला कीं—

[ कारकुनाकडे केलेलें बोट यमुनेकडे नेत आणि यमुनेकडे फिरविलेली नजर कारकुनाकडे पोंचवीत पण बोटाचा रोख मात्र यमुनेवरच कायम ठेवून उत्तराच्या अपेक्षेनें थांबतो. ]

**कारकून** : ( बाळाचा रोख लक्षांत येऊन भांबावतो ) छे छे छे, तसं कांही नाहीं. मी आलों सरदार भापकरांकडून ...

**यमुना** : ( सरदारांच्या उल्लेखानें अधिकच अवसान आणून ) अगबाई, वेंधळी तर नाहीं मी ! सरदारांकडून आलेल्या माणसांना खुशाल विचारते कुणाकडून आला म्हणून ?

**कारकून** : कांहीं बिघडलं नाहीं. विचारायलाच हवं. ओळख पटण्यापूर्वी दहादां विचारायला हवं.

**बाळा** : मुळींच जरूर नाहीं. यमुनाबाईंना चेहऱ्यावरनं माणसं ओळखण्याचा चांगलाच सराव आहे. सांगितलं तर खोटं वाटेल—सरदारांच्या पागेंतलीं घोडीं दारावरून गेलीं किं टापांच्या आवाजावरून ओळखतात, यमुनाबाई.

**यमुना** : भलती शिफारस काय करतोस बाळा. (कारकूनास) बसा असे. भापकरांची ये-जा कांहीं नवीन नाहीं या घरीं !

**कारकून** : नसेल, मीच नवीन आहे. थोरल्या सरदारांनीं कारभार दिला धाकट्यांकडे. तेव्हां माझी नेमणूक झाली.

**यमुना** : धाकटे म्हणजे--

**कारकून** : उदाजीराव.

**यमुना** : अस्सं ! उदाजीरावांकडे कारभार आला म्हणतां ?

**कारकून** : हो दौलत एकवट आहे तोंवर. पुढें मागें वांटण्या होतील तेव्हां ज्याचा तो कारभारी.

**बाळा** : व्हायच्या आहेत कीं काय वांटण्या ?

**कारकून** : थोरले सरदार आहेत तोंवर नाहीं. त्यांच्या पश्चात् काय होईल तें कोणी सांगावं !

**बाळा** : तें बरोबर. आतां थकले असतील, नव्हे ?

**कारकून** : कोण ? थोरले सरदार ? थकतात कशानं ! अजून अंगकाठी दमदार आहे अन् जबान खबरदार आहे.

**यमुना** : दुसऱ्या बायकोचा परिवार आहे बाळा, त्यांच्यामागं.

**बाळा** : मग बरा आला उदाजीरावांकडे कारभार ? घरांत कांहीं कुरबूर तर नाहीं ?

**कारकून** : कुरबूर ? छत् ! कोणाची मजाल नाहीं अजून वर मान करायची. कारभार दिला म्हणजे काय, उदाजीराव वडील कुटुंबाचे म्हणून. सजवला कोतवालीचा घोडा इतकंच. बाकी धाकटं कुटुंब मोठं चौकस अन् दक्ष आहे हं.

**यमुना** : असायचंच. पण बाळा, त्यांच्या घरगुती गोष्टींत आपण लक्ष कशाला घालायचं !

**बाळा** : खरंच तें ! आपलं पाहणं उदाजीरावांपुरतं.

**यमुना** : काय आणलांत निरोप ? अशी काय मी धांदरट तरी बाई ! अहो, खालीं काय बसलां ? लक्षांतच आलं नाहीं माझ्या. हें काय असं-बसा वर.

**कारकून** : वर कशाला? असा एका बाजूलाच बरा आहे. सरदार-दरकदारां-साठीं घातलेल्या बैठकी या. तिथं कसं बसावं! कारकून मी बोलून चालून.

**यमुना** : असाना कां! थोरामोठ्यांच्या सदरेवरलीं माणसं तुम्ही. कितीही लहान असलीं तरी आम्हांला मोठींच. बसा वर.

**बाळा** : बसा वर. सगळीं माणसं इथें आल्यावर मोठीं होतात. देवाच्या दरबारांत जसा भेदभाव नाहीं, तसा यमुनाबाईच्याही दरबारांत नाहीं. व्हा असे वर-टेकून बसा खुशाल. वारासुद्धां घालतील यमुनाबाई.

**कारकून** : काय बोलतां हें? यांचा वारा? (यमुनाबाईकडे पाहात) इथली गोष्ट निघतांच यजमान किती अलुलकीनं बोलतात, तें काय सांगावं!

**बाळा** : कोण धाकटे यजमान ना? अहो, अलुलकीनं बोलण्याजोगंच ठिकाण आहे हें! बरं, काय आपलं नांव?

**कारकून** : माझं नांव भिकाजी विठ्ठल.

**यमुना** : भिकाजीपंत, तुम्ही कीं नाहीं, असे नीट बसल्यावांचून मला नाहीं बरं वाटायचं बाई. असं परक्यासारखं कां? याउपर तुमचं येणं-जाणं नेहमीच व्हायचं आहे.

**कारकून** : पण तसं होईपर्यंत केळीच्या पानाची कोवळी गुंडाळी उलगडणार कशी?

**बाळा** : तुम्ही नीट बसल्यावाचून यमुनाबाईची मळमळ थांबणार नसली, तर ती गुंडाळी अवेळ पत्करून नको कां उलगडायला?

**यमुना** : असूं दे रे बाळा. त्यांना संकोच वाटत असेल तर-भिकाजीपंत, बसा कसेही.

**कारकून** : आतां कसं बोललां! अहो, मी काय ख्यालीखुशालीनं बसायला आलों आहे? यजमानाचं देणं तुमच्या हवालीं केलं कीं, मी देवदर्शनाला मोकळा झालों. (बासन पुढें ठेवून तें सोडीत पण बाळाकडे पाहून साशंकित होत) हे कोण?

**यमुना** : हे ना? हे बाळाभाऊ! (पण भिकाजीपंताची साशंकित मुद्रा पाहून अधिक खुलाशादाखल) घरच्यासारखे आहेत हे.

**बाळा** : होय भिकाजीपंत, मी अगदीं घरच्यासारखा-फक्त या घरांतला नव्हे इतकंच.

**कारकून** : हरकत नाहीं. घरांतला काय अन् घरच्यासारखा काय, बेरीज-बाकी बरोबर. (बासन उलगडून त्यावर बोट ठेवून) हे दोन वाण पाठविले आहेत

यजमानांनीं. ( पातळाची घडी हातांत घेऊन ) पैकीं एक. हे जहानाबादी पातळ. रंग कुसुंबी. गर्भरेशमी. जरीकांठी.

**यमुना** : ( सरदारांकडील वानगी बाळाच्या निदर्शनास आणण्याच्या हेतूनें फाजील कौतुक करीत ) जहानाबादी पातळ ? माझ्या ग बाई !

**बाळा** : ( यमुनेच्या कौतुकाला अधिक दुजोरा देत ) मागें श्रीमंतांकडून आलेलीं पातळं फिकीं वाटतात यापुढें ! नव्हे यमुनाबाई ?

**कारकून** : श्रीमंतांकडून आलीं होतीं ?

**बाळा** : श्रीमंतांच्या घरच्या बारशानिमित्त इंग्रजबहादुरांकडून नजराणा आला. यावनी नजराणा श्रीमंत काय जामदारखान्यांत ठेवून घेतात ? त्यांनीं तो लगेच विल्ह्यास लावला. जवाहीर हिंमतखान पन्हीला दिलं अन् सणगं आलीं यमुना-बाईंच्या घरीं.

**कारकून** : इंग्रज बहादुरांकडून श्रीमंतांना आलेला नजराणा ! मग काय पुसावी त्याची आरास !

**बाळा** : पण सांगतों ना, तो देखील फिका वाटतो यापुढें.

**कारकून** : एकेकाचं देणं असतं. असो, त्या पातळावरचा हा खण. दोरव्याचा. रंग पारवा. गर्भरेशमी. जरीकांठी.

**बाळा** : ओहोहोहो, श्रीमंतांकडून नुसतींच पातळं आलीं. असा पारवा खण नाहीं आला. किंबहुना, खणच आला नाहीं. नव्हे कां यमुनाबाई ?

**कारकून** : दोरव्याचा हं. खण–पातळ दोन्ही जरीकांठी.

**बाळा** : दोन्ही जरीकांठी. भिकाजीपंत, जोड मोठी साखळीदार घातली आहे घालणारानं ! कुसंबी पातळावर पारवा खण. वा ! रंगाची खुबसुरती म्हणतात ती अशी.

**कारकून** : हें तुम्ही ओळखलं ना ? वाकबगार दिसतां बुवा. काय करतां उदीम ?

**बाळा** : तमासगीर मी. तमाशा करतों, दुसरं काय !

**कारकून** : ( हादरून ) तमाशा ? म्हणजे कोणी नटवे तर नाहीं ?

**बाळा** : नाहीं भिकाजीपंत. नटव्याला या मिशीची चव कशी ठेवतां येईल ? तें काम आमचा नाच्यापोऱ्या करतो.

**कारकून** : ( हलकें झाल्यासारखें ) करूं दे त्याला खुशाल. तुम्ही नाहीं ना करीत ?

**बाळा** : मुळींच नाहीं. पण काय हो भिकाजीपंत, तुम्ही कधीं तमाशा पाहिला आहे कां हो ?

**यमुना** : हें काय भलतंच विचारणं तुझं ? दिसतं कां यांच्या चेहऱ्यावरून तसं ?

**बाळा** : चेहऱ्यावर कसं दिसेल यमुनाबाई ? हे कधीं कळावंतिणीचा उंबरा चढतील असं दिसतं कां यांच्या चेहऱ्यावर ?

**कारकून** : चुकतां आहां बाळाभाऊ, चुकतां आहां. कळावंतिणीचा उंबरा चढणारा मी नव्हे, हं. माझं येणं कार्याकारणानं घडलं. यजमानांची कामगिरी करायची म्हणून. आतां त्याचाही दोष आहे; नाहीं असं नाहीं. पण तो नटव्याचं तोंड बघण्याहून गौण.

**बाळा** : इतकं भयंकर आहे कां हो नटव्याचं तोंड ?

**कारकून** : भयंकर ? अहो, इथें येण्याचा दोष देवदर्शनानं तरी जातो. पण तो ! अंहं. त्यासाठीं सचैल स्नान करून प्रायश्चित्त घ्यावं लागतं.

**बाळा** : अरेच्या !

**कारकून** : तर ? स्नानानंतर नवग्रहाचा जप करावा लागतो, एक सहस्र. अश्वत्थाला प्रदक्षिणा घालाव्या लागतात, एकशे अकरा. अन् दिवा निश्चक्र उपोषण करून नक्तांत भोजन करावं, तेव्हां दोष-परिहार होतो, अशी रूढी आहे.

**बाळा** : अगगग ! मग आमच्या दोषाला रेघ नाहीं, भिकाजीपंत. कारण ही आबदा तमासगिराचं डफ घेतल्यापासून सारखी आमच्यामागं लागली आहे.

**कारकून** : लागणारच ! धंदा पत्करला ना तुम्हीं ! पण आतां दोषाची गुमान बाळगूं नका, बाळाभाऊ.

**बाळा** : नको ? तुम्ही म्हणतांच तर नाहीं बाळगीत.

**कारकून** : प्राक्तनानुसार व्हायचं तें होऊन गेलं. अन दोषाचं चरित्र असं चमत्कारिक आहे बाळाभाऊ, अल्प असेल तेव्हां दोषाला दोष म्हणतात. तोच बहु झाला कीं, तात्काळ त्याचं गुणांत रूपांतर होतं. असं हें गुणदोषाचं शास्त्र मोठं दारुण आहे. तें तुम्हीं विसरून जा. ( बासनाकडे पाहात ) एकंदरींत तुम्ही तमासगीर आहां तर ! ( यमुनाबाईकडे पाहात ) मग या ठिकाणचा स्नेहसंबंध

कांहीं वावगा नाहीं. बरं मग ? वाण पाहिलेत यमुनाबाई ? पसंत पडले ? पालटून आणायला नकोत ? संकोच नको. तशी मोकळीक ठेविली आहे यजमानांनीं.

**यमुना** : संकोच कशाचा भिकाजीपंत ! पण आतां म्हणतांच आह्यां, तर दाखवून आणते कशी तिला !

**कारकून** : तिला ? म्हणजे आपल्यासाठीं नव्हे कां हें ? दुसऱ्या कोणी आहेत कीं काय ?

**बाळा** : तर ? अहो, हें वरचं बासन ! आंतलं ठाण वेगळंच आहे.

**यमुना** : पुरे रे बाळा. हें किनई भिकाजीपंत, माझ्या मुलीसाठीं.

**बाळा** : समजलं कां भिकाजीपंत ? यांच्यासाठीं नव्हे, यांच्या मुलीसाठीं. यांची मुलगी मागच्या माडींत रुसून बसली आहे—पातळासाठीं.

**कारकून** : ( चपापून ) असं कां ? ( गयावया करीत ) मला माहित नव्हतं हें, यमुनाबाई.

**बाळा** : हं, तशी रांगोळीच आहे हलक्या हाताची. सांगितलं तर समजतं, आई-न्-मुलगी. नाहीं तर वाटतात, बहिणी-बहिणीच !

**कारकून** : होईल खरी चूकभूल तशी. ( सांवरून ) बाकी या कुसुंबी रंगाला वयाची अट नाहीं हं.

**बाळा** : बिलकूल नाहीं. मोठा समतोल रंग. वाण नेसावा पोफळगांठीनं अगर निऱ्यांवर गांठ मारून. कसाही.

**कारकून** : तसाच हा दोरव्याचा खण, पारवा.

**बाळा** : तो देखील रंगाला समतोल. चोळी घालावी आईनं अगर मुलीनं, कुणीही.

**यमुना** : बाळा, तुझ्या तोंडाला कांहीं अडसर ! भिकाजीपंत, रंगाची इतकी शहानिशा झाल्यावर दाखवायचे कशाला तिला ! दोन्ही वाण आवडले, ठेवून घेतले, असं सांगा उदाजीरावांना. आहे ना मुक्काम इथेंच ?

**कारकून** : मुक्काम आहे. पण अगोट तोंडावर आली म्हणजे कुणब्याची जशी धांदल होते, तशी दरबारांत धावपळ चाललेली आहे.

**बाळा** : कां हो ? कांहीं मसलत अंगाशीं आली कीं काय ?

**कारकून** : पंढरपुरांत झालेलं तें शास्त्रीबुवाचं प्रकरण ! इंग्रजांनं त्वष्ट लावलंय श्रीमंतांना.

**बाळा** : पण डेंगळे पाटील तर फरार झाले, असं ऐकतों. मग त्वष्ट लावायचं कारण ?

**कारकून** : त्यांचा पाठपुरावा श्रीमंत अंतःस्थपणें करतात, असा इंग्रजांचा दावा आहे. त्याची निखालसता करण्यासाठीं श्रीमंतांच्या वतीनं आमचे उदाजीराव अन् ते दौलतराव घोरपडे संगमावर घालताहेत हेलपाटे.

**यमुना** : बरं ग बाई, अशा घोडदौडींत बरी आठवण राहिली आमची ? मग कसचे येतात उदाजीराव इकडे !

**बाळा** : हळहळूं नका, यमुनाबाई. शिकाऱ्याच्या भयानं वाघ हुसकला, तरी तो आपला रहाळ विसरत नाहीं. अन् ओळखीच्या जागीं पाण्याला आल्यावांचून राहात नाहीं.

**कारकून** : इकडे येण्याचा मानस असावा बहुधा. पण माझ्यापाशीं तसं कांहीं बोलले नाहींत

**बाळा** : कसं बोलतील ? कारण तुमची नेमणूक नुकतीच झालेली, थोरल्या सरदारांकडून. अजून तितकी भीड चेपली नसेल. नाजूक कामाची तऱ्हाच अशी असते, भिकाजीपंत. भीड चेपल्यावांचून तोंड खुलत नाहीं.

**कारकून** : वा ! मार्मिक उद्गार !

**बाळा** : संवय तमाशांतली. गहिरं बोलल्यावांचून रंगत नाहीं फड.

**यमुना** : या बोलभाड माणसाच्या तोंडीं काय लागतां, भिकाजीपंत. अवशींच्या चौघड्यापासून पहांटच्या चौघड्यापर्यंत खळ नाहीं बोलण्याला. बरं, दुसरं कांहीं ?

**बाळा** : आणखी काय दुसरं ? लंकेतलीं सगळीं चिरगुटं संपली तरी मारुतीची शेपटी चार बोटांनीं उघडीच !

**कारकून** : तसं नाहीं, बाळाभाऊ. बरी आठवण केली त्यांनीं. नाहीं तर मनांतलं मनांत राहून जातं, तसं खिशांतलं खिशांत राहून गेलं असतं. ( अंगरख्याचें बहाल वर करून आंतल्या बारांबदीच्या खिशांत हात घालीत ) लेण्या-लुगड्यापैकीं लुगडं झालं, पण लेणं राहिलं. ( पुतळ्यांची माळ बाहेर काढून ) ही पुतळ्यांची माळ. एकूण वीस तारं. सर्व पुतळ्या एकजात कोऱ्या. पानघाटी. मोरशेटजींनीं सुलाखून पारखून दिल्या आहेत.

**बाळा** : अरे वा! काय चमक आहे एकेका पुतळीची! अगदीं बावनकसी लगडीचे लचके तोडून आणले आहेत जसे! काय हो भिकाजीपंत, या लेण्याप्रमाणं ते वाणही मोरशेटजींच्या पसंतीनंच आले असतील!

**कारकून** : अचूक ओळखलंत बुवा. कसं हो?

**बाळा** : यमुनाबाईंना एकदम पसंत पडले त्यावरून.

**कारकून** : म्हणजे?

**बाळा** : यमुनाबाईंना काय आवडतं अन् काय नाहीं, हें एक त्यांनाच अचूक कळतं. किंवा मोरशेटजींचं देणं यमुनाबाईंना नेमकं पसंत पडतं असं म्हणा हवं तर!

**यमुना** : तोंड आवर बाबा आतां!

**कारकून** : एकंदरींत मोठे जाणिक आहेत हे, यमुनाबाई. मोरशेटजींना अचूक शोधून काढलं त्यांनीं.

**बाळा** : सोपं आहे तें भिकाजीपंत. रंगाची पारख रंगांत भिजलेल्या माणसांना, तशी इतरांना नाहीं.

**कारकून** : खरं आहे. या निमित्तानं तुमची ओळख झाली हें एकपरी बरं झालं.

**बाळा** : या निमित्तानं असेच येत राहिलां, तर अशा कितीतरी ओळखी होतील.

**यमुना** : बाळा!

**कारकून** : (उठण्याच्या तयारीनें) येऊं मी आतां?

[भिकाजीपंत अशा रीतीनें निरोप घेत आहेत तोंच गुणवती अत्यंत उल्हसित वृत्तीनें, प्रीतीच्या प्रत्ययानें येणाऱ्या बेदरकारपणानें, नाचत-गात आंतून येते. ती तोंडानें म्हणत आहे, "कधीं येशील, भेटशील, प्रीत तपशील सांगशील तरी। प्राणसख्या—" तोंच तिचें लक्ष भिकाजीपंताकडे जातें आणि ते परके गृहस्थ पाहून ती थबकते.]

**यमुना** : ही माझी मुलगी, भिकाजीपंत, गुणवती.

**बाळा** : (भिकाजीपंत गुणवतीच्या रूपानें आणि विशेषतः तिच्या खेळकरपणानें चकित झालेला पाहून) पाहिलात वाण, भिकाजीपंत? पसंत पडला? पालटून आणायला नको?

**यमुना** : कहर केलास बाळा तूं आज !

[ पण गुणवती कोणाकडेच लक्ष न देतां गाण्याच्या बैठकीकडे जाते. तंबोरा घेऊन गवसणी काढतां काढतां मघांचा अपुरा चरण पुरा करते. " प्राणसख्या जीव कष्टी, तुजसाठीं जैसी मैना झुरझुरी " ]

**गुणवती** : तबलजी आला नाहीं कां ग आई ? अन् सारंगीवालाही नाहीं ! मग साथीला कोण ? ( हें ती आंतून येत असलेल्या होनाजीकडे पाहात म्हणते आणि तंबोरा लावीत हांक मारते ) होनाजीराव ! ( भिकाजीपंत होनाजीकडे पाहातो. तो हातांत एक चिठोरें घेऊन वाचीत येत आहे. गुणवती तारा पिळीत म्हणते—" साथीला नाहीं कोणी, म्हणूं मी कशी ग बाई लावणी ! " हें तिचें स्वरचित कवन ऐकून होनाजी तिच्याकडे पाहून मान हलवितो आणि स्मित करतो. त्याच्या स्मितानें उत्तेजून गुणवती मोठ्यानें हंसते. होनाजी बैठकीजवळ येतो. यमुना बाळाकडे पाहाते ) साथीदार आले नाहींत, होनाजीराव.

**होना** : अग, अजून बसवायची आहे लावणी. उगीच साथीदारांची घाई कां ! साधा ठेका धरला म्हणजे झालं.

**गुणवती** : तो तरी हवा ना ?

**होना** : तो मी धरतों चल. आहे काय त्यांत. लावणी करतो त्याला काय ठेका धरतां येत नाहीं ? ( बाळाकडे लक्ष जाऊन ) अन् हा माझा सौंगडी नाहीं कां ! कां रे, असा अगदीं तिऱ्हाइतासारखा कां ?

**बाळा** : ती शागीर्द, तूं उस्ताद. ठेकाही धरणार म्हणतोस. मग आपण कशाला पडा मध्यें ?

**होना** : आतां काय नवीन पडायचं आहे ? नव्हे का ग गुणवती ?

**यमुना** : पण इतकी तारांबळ कां ? येतील साथीदार. गुणवती, हे पाहा कोण आले आहेत ते.

**गुणवती** : ( तंबोरा जुळवीत, त्रासिकपणानें ) कोण ?

**यमुना** : अग कोण काय ? उदाजीरावांकडून आले आहेत.

**गुणवती** : ( दुर्लक्ष करून ) हं, सांगा होनाजीराव.

[ बाळा यमुनेकडे पाहात उपरोधिकपणानें आश्चर्य प्रकट करतो. ]

**यमुना** : ( संतापून चढ्या स्वरानें ) कांहीं विचारपूस करशील कीं नाहीं ? **कारकून** आहेत ते.

**बाळा** : ( आढ्यतेनें ) खास उदाजीरावांनीं धाडलेले.

**कारकून** : ( यमुनेस ) माझी कसची विचारपूस ! तुम्ही नाहीं कां केली ?

**बाळा** : केली. पण करण्या–करण्यांत फरक असतो, भिकाजीपंत. विडा तोच. पण एक मालगांवी पांनाचा अन् दुसरा गंगेरी पानाचा. तोंड सारखंच रंगलं तरी चव वेगळी.

**यमुना** : ( अपरूपानें ) उदाजीरावांकडून काय आणलंय त्यांनीं ! ( तें गुणवतीला दाखविण्याच्या उद्देशानें बासनाला हात घालीत )

**बाळा** : ( बासनाकडे बोट दाखवीत ) अहेरादाखल !

**यमुना** : पाहिलंस कां हें ?

**गुणवती** : तूं पाहिलंच असशील !

**बाळा** : देवडी ओलांडल्यावांचून सदर कशी दिसेल ? त्यांनीं पाहिलं. पण पाहण्या–पाहण्यांत फरक असतो, गुणवती.

**यमुना** : असतो तर ! असं काय हें उपराळू वागणं तुझं ? कांहीं **अदब** राखशील कीं नाहीं ?

**गुणवती** : ( चिडून ) कुणाची अदब ?

**बाळा** : ( भिकाजीपंतांकडे दोन्ही हात ओवाळीत ) यांची !

**कारकून** : माझी अदब ती काय राखायची !

**बाळा** : वा वा, तुमची अदब नाहीं राखायची तर कुणाची हो ? ( होनाकडे पाहात उपरोधानें ) गुणवतीच्या दौलतदार यजमानांचे कारकून तुम्ही ! ( गुणवतीकडे मोहरा फिरवून ) म्हणजे प्रतियजमानच !

**गुणवती** : ( खुंटी पिळतांना खळ्कन तार तुटते. होना वळून पाहतो. गुणवती संतापते ) असं उधळून बोलूं नको बाळा.

**कारकून** : ( गोरामोरा होऊन ) फार लागिर बोलतां बुवा.

**यमुना** : ( बासन तिच्याकडे सरकवीत ) पाहा तर खरी काय घेऊन आले आहेत ते ? ( बासन उलगडीत ) हें पातळ !

**बाळा** : जहानाबादी, कुसुंबी, गर्भरेशमी !

**यमुना** : अन् हा खण.

**बाळा** : दोरव्याचा, पारवा, गर्भरेशमी !

**कारकून** : ( महत्त्वाचा तपशील गाळलेला पाहून ) दोन्ही जरीकांठी.

**बाळा** : ( चूक सुधारीत ) हो कांठ राहिलेच. दोन्ही जरीकांठी.

**यमुना** : तशीच ही पुतळयांची माळ—

**बाळा** : एकूण तार्टं वीस. सगळया पुतळ्या एकजात कोऱ्या.

**कारकून** : पानघाटी.

**बाळा** : अरेच्या ? घाट राहिलाच ! पानघाटी. मोरशेटजींनीं सुलाखून पारखून दिल्या आहेत. असंच ना भिकाजीपंत ?

[ हें तपशील-निवेदन चालू असतां होना नवी तार लावीत आहे. गुणवती होनाच्या चेहऱ्याकडे पाहात त्याच कामीं गढल्याचें दाखवीत आहे. निवेदन संपलेलें पाहून ]

**गुणवती** : ( कुचेष्टेनें कारकुनाला ) तुम्ही आणलंत कां हें ? ( आपणांस उद्देशून गुणवती प्रथमच बोलली यामुळें तो हरखतो. ) आईसाठीं वाटतं ?

**कारकून** : ( धक्का बसल्यासारखा ) छे छे छे !

**यमुना** : ( पुतळयांचीं माळ रागानें बासनावर आपटून ) हा काय चहाटळपणा तुझा ! उदाजीरावांनीं तुझ्यासाठीं धाडलंय म्हणून सांगितलं ना !

**गुणवती** : ( तंबोरा उचलीत ) ऐकलं. ठेव बासनांत गुंडाळून. ( या तिच्या बेफिकीरीनें कारकुनाचा चेहरा उतरतो.) हं, सांगा होनाजीराव. बाळा, धर ठेका.

[ यमुना धुसफुसत बासन आवरून ठेवते. हें पाहून कारकून उठतो. होना चिठोऱ्याकडे पाहात पुटपुटत मांडीवर ठेका धरीत आहे. बाळा तबल्याचे ठोकळे हातोडीनें ठोकून सुराशीं तबला जमवीत आहे. गुणवती तंबोरा छेडीत आहे. यमुना कारकुनाला पोचविण्यासाठीं दरवाजापर्यंत जाते. ]

**यमुना** : हें पाहा, ती आहे गाण्याच्या धांदलींत. नादिष्ट आहे ती. तिचं बोलणं-वागणं नका मनावर घेऊं.

**कारकून** : यांत काय मनावर घ्यायचं, यमुनाबाई. आमच्या थोरल्या यजमानांची निवड झाली लाखांतली अन् उदाजीरावांची झड पडली, पडावी तिथें. यांत मनावर तें काय घ्यायचं. वा ! चोख माल. किलकिल्या नजरेनं पाहिलं तरी रेसभर आयब दिसायची नाहीं. बरं, येतों मी.

[ होनाचें लक्ष चिठोऱ्यावरून भिकाजीपंतांकडे लागलेलें पाहून गुणवती अस्वस्थ होते. बाळा यमुनेकडे पाहात बेरंग वातावरण निवळण्यासाठीं तबल्यावर एक मुखडा मारतो. ]

**बाळा** : हं, बोल होना. कोणती केली आहेस लावणी ?

**गुणवती** : ( स्वरानें आर्त—रळीचा फांसा होनाच्या गळ्याभोंवतीं अडकवीत ) सांगू नका हो, होनाजीराव ! ( नजरेनें बाळाशीं दुरावा करून होनाची जवळीक साधीत ) नाहीं सांगायची तुला.

[ तिचे हे दोन्ही लाडिक भाव सलगीला आसावलेले पाहून होना प्रेमिकाच्या तृप्तीनें स्मित करतो. हें यमुनाबाई खिडकींत उभी राहून पाहात आहे गुणवती होनाशीं वागते कशी याचें बाळानें केलेलें वर्णन तिच्या प्रत्ययास येतें. तिच्या मनांतलें हें चाललेलें गणित बाळा ओळखतो. पण तो मुद्दाम तिकडे दुर्लक्ष करतो. ]

**बाळा** : आँ ? कां ग ? सांगायची नाहीं तर आलां कशाला इथें ? मागच्या माडींत बरे होता कीं घुमत कबूतरासारखे ! म्हणे सांगायची नाहीं !

**गुणवती** : होच. नाहींच सांगायची !

**बाळा** : अग, कां ? कायरे होना ?

**होना** : मलारे काय माहीत, कां तें ?

[ यमुना मान तुकवीत पोपटाचा पिंजरा घेऊन आंत जाते. ]

**बाळा** : ( रागाचा आव आणून ) मग बसा एकमेकांना ऐकवीत. जातों मी. ( उठूं लागतो. )

**होना** : ( त्याचा हात पकडून बसवीत ) अरे बस रे ! जिवाचा मैतर तूं माझ्या.

**बाळा** : असं तुला वाटतं. तिला नाहीं ना वाटत !

**गुणवती** : होनाजीरावांची एवढ्या अपरूपाची भूपाळी तूं टाकून दिलीस काय? मग लावणीची चव काय तुला?

**होना** : घे, कां रागावली हें कळल?

**गुणवती** : म्हणे कोण ऐकून घेणार? काय सांगावी त्या भूपाळीची गोडी! होनाजीरावांनीं मला म्हणून दाखविली, तेव्हां ती ऐकतां ऐकतां माझा असा लय लागला कीं—

**बाळा** : होनाच्या खांद्यावर मान टाकून केव्हां डोळा लागला तें कळलं सुद्धां नाहीं. (होना हंसतो. गुणवती लटक्या रागानें तबल्याची गिरदी त्याच्या अंगावर फेकते. ती चुकवीत) म्हणून रागावलीस होय? अग, ती भूपाळी तमाशांत कां म्हणायची आहे? तुझ्याहून त्या भूपाळीचं मोल मी अधिक जाणतों. त्या भूपाळींतले शब्द म्हणजे डाळिंबाचे दाणे आहेत दाणे. त्यांची चव बैठकींतल्या पोपटांना, तमाशाला येणाऱ्या कावळ्यांना काय त्याचं!

**गुणवती** : (आढ्यतेनें) आतां आम्ही ती बसविली आहे.

**बाळा** : भूपाळी?

**गुणवती** : (कुर्रेबाजपणानें) हो हो, भूपाळी. अन् श्रीमंतांपुढें बैठक होईल, तेव्हां म्हणणार आहे मी! समजलास? कृष्णाची इतकी नेटकी शब्दावळी कुठे भेटणार नाहीं, अशी आहे ती. (होनाजीची बाही ओढून त्याच्या मुद्रेवर दृष्टी खिळवीत) नाहीं कां हो होनाजीराव? (आणि त्याच स्थितींत ती भूपाळीचे स्वर गुणगुणूं लागते)

**बाळा** : (त्या स्वराकडे कान लावीत) म्हण म्हण, मोठ्यानें म्हण. ऐकूं दे तर खरी.

**गुणवती** : नाहीं म्हणणार जा.

**बाळा** : (पडलेल्या चेहऱ्यानें) बरोबर आहे, मी सांगून कशी म्हणशील तूं! होना, सांगरे हिला म्हणायला. ऐकायची आहे मला.

**होना** : (गुणवतीकडे पाहात) ऑं? अशी पाळी आली कां?

**बाळा** : येणारच रे! नळराजाची भेट करवून दिल्यावर दमयंती गेली त्याच्या महालांत, अन् हंस राहिला पाण्यांत.

**होना** : असं असं! (हंसत गुणवतीकडे पाहातो आणि बाळाच्या पाठीवर थाप मारतो. गुणवतीला ही चेष्टा रुचते, पण ती मान वेळून डोळे वटारते आणि

अखेर तीही हसूं लागते.) म्हण, म्हण ग गुणवती. ऐकूं दे त्याला. ( मिस्किलपणानें आपल्या सांगण्याला काव्याचें रूप देत ) त्या महालाच्या सज्जांत येऊन म्हण ई. त्या सज्जाखालीं आहे पाण्याचं तळं-त्यांत फुल्लीं आहेत कमळं. कांहीं निळीं, कांहीं लाल, कांहीं शुभ्र पांढरी-हंसासारखीं. ती पाहून हंसाला पडला विचार. कोणत्या कमळांतले बिसतंतू लागतील बरं चवदार ? तोंच त्याच्या कानावर आली एक लकेर. वर मान करून पाहतो, तों अरुणोदयाच्या रंगानं न्हालेली एक मदनमंजिरी सज्जांत उभी ! अन् ती म्हणत आहे—" घनःश्याम सुंदरा, श्रीधरा—

[ अशी होनानें सुरवात करून देतांच गुणवती म्हणूं लागते. बाळा हलकासा ठेका धरतो- ]

घनःश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ।
उठि लौकरी वनमाळी उदयाचळीं मित्र आला ॥
विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सादर गुरुपायीं ।
अध्यापन गुरु करिती शिष्यही अध्ययना उदयीं ॥
याज्ञिकजन कुंडांमधिं आहुति टाकिताती पाही ।
रविप्रभा पडुनियां उजळल्या शुद्ध दिशा दाही ।
हें माझें पाडसें सांवळे ऊठ कृष्णाबाई ।
सिद्ध सर्व बळिराम घेउनि गोधनें वना जाई ।
मुनिजन मानसहंसा श्रीमनःकमलभृंगा ।
मुरहर पंकजपाणी पद्मनाभा श्रीरंगा ।
शकटांतर सर्वेशा हे हरि प्रतापतुंगा ।
कोटी रवीहुनि तेज आगळें तुझिया वदनाला ।
होनाजी–बाळा नित्य ध्यातसे हृदयीं नाममाळा ।
उठि लौकरि वनमाळी० ॥

[ भूपाळी म्हणून होतांच होना व गुणवती अभिप्रायाच्या अपेक्षेनें बाळाकडे पाहतात. ]

**होना** : दूधपाण्याचा निवाडा हवा आहे तिला हंसाकडून !

**बाळा** : कपिला गायीच्या चोख दुधाला निवाडा कशाला ? वा होना, वा गुणवती ! नेटक्या गळ्यांतून निघालेली नेटकी शब्दावळी !

**गुणवती** : तारीफ शब्दावळीची, माझी नव्हे.

**बाळा** : नव्हे कशी ? मी तर म्हणेन तुझीच.

**गुणवती** : अं हं ! ( होनाच्या खांद्यावर बोट ठेवीत ) यांची.

**बाळा** : बरं, यांची तर यांची.

**होना** : मघाशीं कुठें बिनसलं होतं रे तुमचं ?

**बाळा** : सांगू कां कुठें तें ?

**गुणवती** : कांहीं नको वाजूं नये तिथें तोंड वाजतं तुझं. केवढी अधीर झाले होते मी नवी लावणी म्हणायला !

**बाळा** : अन् आतां काय झालंय ! अधीरपणा ओहटून गेला असेल तर त्याला भरती आणणारा हा चंद्र बसलाच आहे तुझ्यापुढें ! ( होनाच्या पाठीवर थाप मारीत ) काय रे माझ्या चांदाच्या तुकड्या, अधीरपणांत मोठी गंमत असतें, नाहीं रे ?

**गुणवती** : हें तूं कशाला सांगायला हवं ?

**बाळा** : खरंच ! खात्याची चव देखत्यानं काय बोलून दाखवावी.

**होना** : वा, बाळा वा ! अंतरीचं गूज खोलून दाखविलंस ! उगीच नाहीं माझा अर्धा जीव तुझ्या गळयांत रुतला तो.

**बाळा** : अन् अर्धा गुणवतीच्या. मग तुझ्यापाशीं काय राहिलं ?

**होना** : अरे, तुम्ही दोघे जतवाल अन् जोगवाल तो मी ! तुमच्याहून माझी वेगळीक आहे कुठें ? ( होनाचें हे सहज व स्वार्थनिरपेक्ष बोलणें वेंधक वाटून गुणवती त्याच्याकडे कौतुकानें पाहूं लागते. पाहतां पाहतां तिचा तंबोऱ्यावरील हातही थांबतो. लावणीच्या चिठोऱ्याकडे पाहणारा होना तंबोरा थांबलेला ऐकून वर मान करतो. ) ए, थांबलीस कां अशी ? ( तिची स्थिर दृष्टी आपल्यावरच खिळलेली पाहून ) अन पाहसी अशी कां लुब्ध मृगीसरसी ?

**गुणवती** : लुब्ध ? मी लुब्ध कां न व्हावं ? आतांपर्यंत मी तुमच्या सुरांची नी शब्दांची पायिक होते. तेच अनमोल आहेत, असं मानीत होत्यें. पण त्याच्या पलिकडे असलेलं तुमचं अंतरंग पृथ्वीच्या मोलाचं आहे, हें मला यांवळीं कळलं.

**बाळा** : अग पण तें त्याच्याजवळ आहे कुठें ?

**होना** : बाळा काय म्हणतो आहे, गुणवती ?

[ याचें उत्तर न देतां ती डावा हात उचलून छातीवर ठेवते आणि होनाकडे पाहतां पाहतां डोळे मिटते. तिचें तें ध्यान नाकपुड्यांच्या होणाऱ्या स्पंदनामुळें होनाला वेधक वाटतें. त्यामुळें तिच्याकडे पाहात तो देखील एकचित्त होतो. ]

**बाळा** : ( त्या दोघांचें सात्म्य पाहात ) लागली वाटत दोघांची समाधी! अरे ए, मागच्या माडींत बसून हेंच चालतं वाटतं तुमचं ?

**होना** : ( भानावर येऊन ) छेड ग, तंबोरा ( गुणवती तंबोरा छेडूं लागते. बाळा ठेका धरतो. होना सूर घोळवून म्हणूं लागतो. )

**कधीं येशील, भेटशील, प्रीत तपशील सांगशील तरी ।**
**प्राणसख्या जीव कष्टी तुजसाठीं जैसी मैना झुरझुरी ॥**

[ हें तोंड म्हणून तें तो गुणवतीस म्हणावयास सांगतो. तोंच मोरशेट येतात. त्यांचें स्वागत तिघेहि आस्थेनें व अदबीनें करतात. ]

**मोरशेट** : ( बैठकीवर स्थिर होतांना ) बाळा–( पण मनांत आलेलें बोलावें, न बोलावें या अनिश्चयानें ते थांबतात. होनाला गाणें सुरू करावें, न करावें याची पंचाईत पडते. गाणें थांबलेलें लक्षांत येऊन ) अरे थांबला कां ? चालू द्या तुमचं ! ( होना तेंच तोंड पुन्हा म्हणतो ) यमुना कोठें दिसत नाहीं ?

**बाळा** : (तंबोऱ्याच्या स्वरांत गुणवंतीला हा प्रश्न ऐकूं आला नाहीं हें ओळखून ) यमुनाबाई आंत आहेत.

**गुणवती** : आई ना ? आंत आहे. बोलावते हं. ( असें म्हणून ती तंबोरा खालीं ठेवणार तोंच मोरशेट बैठकीवरून उठतात.)

**मोरशेट** : नको नको. तूं कशाला उठतेस! चालू दे तुझं गाणं. मीच जातों.

[ मोरशेट आंत जातात, क्षणभर तिघेंही त्यांच्याकडे पाहात राहातात आणि मग गाणें सुरू करतात. ]

**होना** : " मी पाण्यांतली मासळी—

**गुणवती** : ( थांबवीत ) हें काय ? अशी मधूनच सुरुवात काय म्हणून ? पुनः पहिल्यापासून !

**होना** : ( बाळाला ) पुनः म्हणावला हवं ?

**बाळा** : तिला हवं असेल तर नको म्हणायला ? तोंड गोड आहेना तें. बसलेली मिठी सुटत नसेल ( गुणवतीकडे वळून ) नाहीतर सोडवत नसेल. ( होना गुणवतीकडे पाहून हसतो. ती लटका राग आणून बाळाकडे नापसंतीनें पाहते.)

**होना** : बरं, पुनः पहिल्यापासून !

**कधीं येशील, भेटशील, प्रीत तपशील सांगशील तरी।**
**प्राणसख्या जीव कष्टी तुजसाठीं जैसी मैना झुरझुरी।**

[ होनानंतर गुणवती म्हणूं लागते. पण ती होनापेक्षां प्रत्येक शब्द **अर्थ**भरित स्वरांत म्हणत भावभरित मुद्रेनें त्याच्याकडे पाहते. तिचे हे दोन चरण पुरे होतांच होना पुढील कडी म्हणतो. ]

**मी पाण्यांतली मासळी फार मन सायासीं लाधलें।**
**अभर्वसीं नको टाकूं जसें जळ वळिवाचें वाहवलें।**
**कोंदण कसीले लाल आगीमधें जणूं सोनें तावलें।**
**अशक्त झाले रोड तुझ्यारे प्रीतीला नादावलें।**
**बसले ठायीं ठायीं पाहा मी चिखलाचें बाहुलें।**
**कोणीकडे चुकला वांट भेटीला आज माझ्या फावलें।**

**मज वरती तुमचा शिका जना ठाऊका।**
**हकनाक डाग निर्मळास लावू नका।**
**खिडकींत उभी राहून पाहते टकमका।**
**शिरिं वंद्य मला पादुका भाव हा निका।**
**देतसे बेल-भंडारा मी तुळशी-बुका।**

**राहते व्रतस्थ धरिल्या रीतीं।**
**साधितां योग दर्शन जाहलें मजप्रति।**
**तुम्ही गुलाब-हार मी तर पिवळी केकती।**

**किती रे साजणा विनवण्या करूं।**
**बसायला शिर काढुन आंथरूं।**
**आडल्या वेळेस नको रागे भरूं।**

जैसे मी मुकें जनावर गुरूं।
कोणत्या रीतीनें स्नेहसागर तरूं।
नको रे प्रीतिचा दोर कातरूं।
निकर असा नये करूं येत जा खुशाल माझे घरीं।
एकुलत्या एकल्या नको विसरूं अर्धा क्षणभरी।
कधीं येशिल, भेटशील ० ॥

[ होना ही लावणी संपवितो आणि बाळा त्याच्याकडे प्रशंसापूर्वक पाहात राहतो. ]

**बाळा** : वा ! लावणी मोठी रुचिकर बांधलीस गड्या !

**होना** : खरंच कां रे ? आवडली तुला ?

**गुणवती** : दृष्ट लागेल एखादी.

**होना** : नाहीं गुणवती. माझे शब्द याच्या वाणीनं बाळसं धरितात, अन् तुझ्या नजरेंत रसानं भिजतात.

**बाळा** : छान बोललास. सूर नी शब्द रसरंगांत असे भिजविलेस, अन् कोमल भावाच्या रेशमी धाग्यानं असे आवळून टाकलेस कीं सुरानं रेसभर सरकूं नये, नी शब्दानं तिळभर ढळूं नये.

**होना** : असं ना ? अरे, पण ती करामत माझ्या एकट्याची नव्हे, हिचीही. विचार हिला.

**गुणवती** : ( प्रेमळ रागानें ) काय विचार ?

**होना** : सांगूं ?

**गुणवती** : काय सांगणार ?

**होना** : अरे, ही ध्यानस्थ होऊन बसते शारदेसारखी—

**बाळा** : मोरावर, पिसाऱ्याच्या प्रभावळींत, हातीं वीणा घेऊन !

**होना** : अन् सात्त्विकपणाचा असा भाव पघळते चेहेऱ्यावर कीं—

अमरपुरींचे देव पाहती मुक्यापरी खालीं।
भूतळीं कोण ही अवतरली पुतळी ॥

**गुणवती** : ( मान वेळीत ) हो अवतरते ! उगीच कांहीं तरी नांवाजणी !

**बाळा :** उगीच नाहीं. त्या नाजुक रुपड्याची लावणी बांधतांना असंच कांहीं तरी घडलं असलं पाहिजे.

**गुणवती :** घडायचं तें काय ? यांच्या वाणींतून शब्दच ओघळतात मोत्यांसारखे ! टपटपून गळणारे स्वातीच्या पावसाचे थेंबच जसे !

**बाळा :** ते कुणाकरितां ? या तहानेल्या चातकीकरितां ! त्या मोत्यांच्या थेंबांसाठीं तिची नजर सारखी वर-खालीं होते. हे पाहून कवी बोलून जातों—

**नाजुक रुपडें बुंद मुखोटा नवतीची लाली ।**
**पदरांतुन वर नजर पाहसी सात्त्विकपणें खालीं ॥**

**होना :** बरोबर ओळखलंस. म्हणून मी तिला विचारलं—

**गरतीचा अवघा साज करुनियां आज घटाव घटून ।**
**केवळ सात्विक होऊन मन मोहून घेतिस लुटून ।**
**लवलव हलते तुझें अंग असे गुण सांग शिकलीस कुठून ।**

**बाळा :** मग लागूं दिला कां तिनं थांग ? अहं. नाहीं लागूं द्यायची ती. होना, हिचा सहवास नव्हता तेव्हां त्या लावणींत तूं म्हणून गेलास तेंच खरं.

**होना :** कोणत्या रे ? काय म्हणून गेलों मी ?

**बाळा :** आठवत नाहीं तुला ? इतका तुझ्या बुद्धीला विसर पाडला पाहा हिनं. तूं म्हणालास,—

**स्त्री—चरित्र समुद्र त्यांतून कोण पार पडियेला ।**
**विरळा क्वचित् त्यांत राहिला ।**

**गुणवती :** उगीच कुणाची तरी शिदोरी बांधूं नको यांच्या पदरीं !

**बाळा :** उगीच कुणाची तरी कशी बांधीन ?

**गुणवती :** ऐकूं नका हो, होनाजीराव.

**बाळा :** ठेव हात त्याच्या कानावर हवा तर, पण तूं ऐक.

**चहूं युगामध्यें किती एक बुडाले ऐक त्यांचा दाखला ।**
**तपश्चर्येचा मेरू भंगला ।**
**विश्वामित्रें तप सोडुनियां उर्वशी मागें लागला ।**
**मार्तंड पीतवर्ण झाला ।**

मोहिनीरूप पाहून शंकर लिंगपतन पावला।
ब्रम्हा अपूज्य जगीं ठराविला।

**होना** : इतकंच नव्हे—
अमरेंद्र इंद्रभुवन।
सोडुनियां फिरतो वन।
गौतमी शाप दारुण।
सीता सीता म्हणवुनि प्राणा मुकले लंकापति।
(होना व बाळा दोघे मिळून म्हणतात.)
या इष्काच्या पायीं बुडाले कैक लक्षापती।
खंडीमध्यें तूं एक पार्वती ॥ ध्रु० ॥

**बाळा** : (गुणवतीला) असं आहे स्त्री-चरित्र !

**गुणवती** : (स्त्रीजातीचा कैवार घेऊन) समजलं कसं आहे तें ! अन् पुरुष-चरित्र जसं कांहीं दुधानं धुतलंय नी कापसाच्या बोळ्यानं पुसून काढलंय !

**बाळा** : तसं नव्हे गुणवती. पण लौकिक होतो एकेकाचा.

**होना** : खरी गोष्ट अशी आहे बाळा, लौकिक होतो गावा त्याचा. या कविमनाला ज्याची कळ भिडली, त्याचा लौकिक कवी आपल्या कवनांत उतरून देतो.

**बाळा** : मग बोलणंच खुंटलं. येथून पुढें स्त्री-चरित्राची वेगळी बाजू सुरू झाली.

**होना** : ती कशी काय ?

**बाळा** : कारण ही तुझ्यापुढें ध्यानस्थ होऊन बसणार अन् कविमनाला कळ भिडणार ती अशी,--हें विधिनें वाटतें करुनि एकाग्र चित्त एकांतासी। स्वस्थपणें स्थिरमनें निर्मिलें (गुणवतीला उद्देशून) तुज ऐशा चिद्रत्नाशीं। असंच म्हणणार तूं.

**होना** : ऐकून ठेव गुणवती.

**गुणवती** : हो हो म्हणणार.

**बाळा** : म्हण बापडा-मी काय तुझ्या तोंडावर हात ठेवणार ? अन् ही काय तो ठेवूं देणार ! पण सांभाळ रे ! होनाजी-बाळा म्हणे चतुर जो शहाणा। ही प्रीत रीत अनुभविल आणुन अवसाना। उगीच नाहीं थोरल्या बाजीराव साहेबांनीं "खेळविली नटचंचळ बुंदेली ललना ?" म्हणून लक्षांत ठेव, प्रीतीच्या बेलाग माऱ्यातून पार पडायला अवसान लागत असतं.

**गुणवती** : अवसानाचं तिमाण उभारून चांगला करतो आहेस रे भेद! पण काठीनं पाणी दोन जागीं होत नसतं, बरं कां! पाण्याला पाणी मिळतंच अखेर!

**होना** : बरं, जाऊं द्या रे! लावणीची पुढची कडी म्हणायची आहे कीं नाहीं?

**गुणवती** : नाहीं कशी?

[गुणवती मोठ्या उत्सुकतेनें तंबोरा छेडते. होना चिठोरें पुढें धरून नजर फिरवितो. बाळा तबल्यावर बसतो. तोंच जिन्यांतून बोलणें ऐकूं येतें. तिघेही तिकडे पहातात. उदाजीराव, दौलतराव घोरपडे या आपल्या स्नेह्यासह येतो.

उदाजीराव आपल्या प्रियपात्राच्या घरीं ख्याली-खुशालीच्या झोकांत आला आहे. आपण पाहूं तिकडे स्वामित्वाची छाप आणि आपण गुणवतीसारख्या रूपवतीचे यजमान, हें दौलतरावाच्या मुद्दाम निदर्शनास आणण्याचा त्याचा हेतु आहे.

मोरशेटजींची दखल या तिघांनीं जितक्या तत्परतेनें घेतली तिच्या शतांशानें देखील ते उदाजीरावाची घेत नाहींत. उलट दाखवितां येईल तितकी प्रतिकूलताच ते दाखवीत आहेत. विशेषतः दौलतराव आपणांकडे अधाशी दृष्टीनें पाहात आहे हें लक्षांत येतांच गुणवतीची प्रतिकूलता अधिकच तीव्र होते.

बैठकीवर स्थिर होतांच उदाजीराव व दौलतराव यांचे गुणवतीविषयीं नेत्रसंकेत होतात. दौलतराव आपली पसंती आविर्भावानें दर्शवितो. ती आढ्यतेनें मान्य करीत].

**उदाजी** : मग काय सांगत होतों मी! पण तुम्हांला वाटलं कीं गुलबकावलीची कहाणीच!

**दौलतराव** : (गुणवतीकडे पुनः पुनः पाहात.) चुकलं उदाजीराव. आपण ज़बान परत घेतली. खरोखर थोरल्या बाजीरावसाहेबांच्या मस्तानीचा दाखला आला.

**उदाजी** : आला ना? (त्याच्या मांडीवर हात मारीत) असं आहे दौलतराव! बरं बसा, पान-बीन खायचं कीं नाहीं?

**दौलतराव** : पान खाण्यासारख्या ठिकाणीं आणतां, अन् आतां खायचं का म्हणून विचारतां? खाऊं बुवा दिलं तर!

**उदाजी** : दिलं तर ? अहो असं धर्माचं ताक कां ? हक्कानं मागून घेण्याचं ठिकाण आहे हें ! गुणवती, दे पाहूं तुझ्या गंगेरी पानाचे कुलुपी विडे ! दौलतरावांचं रंगलेलं तोंड जाऊं दे आल्पिष्टण साहेबांपुढें !

[ उदाजीचें हें विड्याचें आवाहन ऐकून गुणवती बाळाला खुणावते आणि विड्यांचा चौफुला हलकेंच पायानें ढकलते. बाळा चटकन् चौफुला उचलून उदाजीरावांपुढें ठेवतो. गुणवतीची क्लृप्ति उदाजीच्या लक्षांत येते. पण तो दौलतरावांमुळें उघड बोलत नाहीं इतकेंच ].

**बाळा** : ( उदाजीपुढील चौफुला दौलतरावांपुढें ठेवीत ) साहेबांचे चाकर म्हणवितात कीं काय हे ?

**उदाजी** : ( दौलतरावाकडे पहात ) नव्हे, चाकर श्रीमंतांचे ! पण इंग्रजांशीं बोलणीं करण्यासाठीं संगमावर राबता आहे यांचा.

**बाळा** : म्हणजे डेंगळे पाटलांच्या तगीरींत यांची नेमणूक झाली वाटतं.

**दौलतराव** : होय. त्यांनीं करूं नये ती आवाडाव केली असं इंग्रजांचं म्हणणं पडलं——

**बाळा** : मग श्रीमंतांच्याही मर्जींतून उतरले असतील डेंगळे पाटील ?

**उदाजी** : कसे उतरतील ?

**दौलतराव** : ( गुप्त राजकारणाचा आव आणून ) उतरले उदाजीराव. तिकडे इंग्रजांनीं त्यांना साष्टीच्या किल्ल्यावर घातलं, इकडे श्रीमंतांनीं त्यांचा घरमाल जप्तींत काढ़ला.

**उदाजी** : बरं झालं, शास्त्रीबुवांच्या खुनाचं प्रकरण निकालांत निघालें तें. जाबसाल तरी सरळ होतील आतां.

**दौलतराव** : हो, मेजवान्यादेखील होतील परस्परांना.

**बाळा** : मग त्या निमित्तानं गाण्याची मजलस होईलच !

**दौलतराव** : कां नाहीं होणार ?

**बाळा** : गुणवतीची बैठक श्रीमंतांपुढें व्हायचं घाटतंच आहे. अनायासें याच पर्वणींत होऊन जाईल.

**उदाजी** : गुणवतीची बैठक ? ती काय म्हणून ?

**बाळा** : या प्रसंगानं जाईल साहेबाच्या कानावर ! अन् गुणवतीचा लौकिक विलायत पाहील.

**दौलतराव** : नक्की पाहील. अहो, नुसत्या खुबसुरतीनंच साहेब दगडासारखा निपचित पडेल. मी पाहिली आहे ना त्याची बिबि? पिठासारखी गोरी, पण खुबसुरतींत पासंगाला लागायची नाहीं. त्यांतून हा साहेब जाणिक आहे. एकदां पाहील तर जन्मभर रावणाच्या दहा तोंडानं नांव काढीत राहील.

**उदाजी** : हें पाहा, गुणवतीच्या लौकिकानं विलायत पाहायला नको, अन् साहेबानं नांव काढायला नको. ती कांहीं धंदेवाईक कळावंतिण नव्हे, कोणापुढें गाणं-नाचणं करायला!

**दौलतराव** : इतकी बंदिस्त आहे कां उदाजीराव?

**उदाजी** : हां, इतकी बंदिस्त! (गुणवतीकडे आढ्यतेनें पाहात)...समजतां काय तुम्ही! ती कांही कुंपणावारी माजणारी कोरांटी नव्हे.? ताटव्यांत बहारणारी शेवंती आहे.

**बाळा** : (गुणवतीकडे वळून–वांकून पाहाणाऱ्या दौलतरावांस) पिवळी!

**उदाजी** : हां पिवळी!

**दौलतराव** : मग आम्हांला तरी गाणं ऐकायला मिळतं कीं नाहीं?

**उदाजी** : कां नाहीं? मुद्दाम आणलं कशासाठीं तुम्हांला?

**दौलतराव** : ऐकणारापेक्षां ऐकविणाराची खुशी असावी लागते.

**उदाजी** : खुशीचा सवाल काय बोलतां दौलतराव! घरच्या मळ्यांत बारमाही माळवं पिकतं. होनाजी, चल काढ एखादी चटकदार लावणी!

**बाळा** : एक कां हो, दहा लावण्या काढील. पण साथीदार आले नाहींत ना अजून! नाहीं म्हटलं तरी आयब दिसणारच.

**उदाजी** : अरे, आयब झांकून टाकील ही तर गुणवतीच्या गळ्याची करामत. (गुणवतीस) हं, कर सुरू!

**गुणवती** : पण माझी नाहीं लागत तबियत!

**उदाजी** : (या साफ नकारानें चमकून) काय?

**बाळा** : (नकाराविषयींच्या उपेक्षेनें) नाहीं लागत उदाजीराव एखाद्या वेळीं!

**उदाजी** : नाहीं लागत म्हणजे?

**दौलतराव** : (एकंदर नूर लक्षांत घेऊन) जाऊं द्या उदाजीराव! गाणं हें गाणाराच्या कलानंच घ्यावं लागतं. पुनः केव्हां तरी! ओळखीची वाट करून

दिलीत, आतां हक्कानं यायला हरकत नाहीं. ( तो उठण्याच्या तयारींत पाहून बाळा विड्यांचा चौफुला घेऊन उभा राहतो. त्याकडे पाहत ) पुनः कशाला ?

**बाळा** : पहिला ओळखीचा, हा निरोपाचा. पुनः या केव्हां तरी. बाकी उदाजीराव घेऊन येतीलच म्हणा.

**उदाजी** : जरूर. पण गाणं-नाचणं जें कांही व्हायचं तें याच माडींत हं दौलतराव !

**दौलतराव** : हरकत नाहीं, याच माडींत.

[ दौलतराव उठून जाऊं लागतो. त्याला दरवाजापर्यंत पोचविण्यास उदाजीराव जातो. त्याला पोंचवून परत येईपर्यंत होनाही जाण्याच्या तयारीनें चिठोरीं एकत्र करतो. बाळा तबला आवरून ठेवतो. गुणवती तंबोऱ्याला गवसणी घालूं लागते. हें पाहून उदाजीराव थांबतो. ]

**उदाजी** : वा ! बैठक संपली की काय ?

**गुणवती** : ( निकाली स्वरानें ) संपली.

**उदाजी** : म्हणणारांनीं संपविली कीं ऐकणाराची संपली असं नाहीं होत !

**गुणवती** : ( खोंचून ) मग काय होतं ?

**उदाजी** : तबियत खुलवून म्हणावं लागतं.

**गुणवती** : ( आळोखे-पिळोखे देत ) म्हणूं सवडीनं. आपल्याला काय, घरच्या मळयांत बारमाही माळवं पिकतं.

**उदाजी** : म्हणजे सवडीनं नव्हे, हरघडीला. मला ऐकायची आहे लावणी, अन् पहायचा आहे नाच.

**गुणवती** : (बेफिकीरीनें) असेल. मला आला आहे कंटाळा.

[ गुणवतीचा व उदाजीचा नूर ओळखून होना व बाळा जाण्याच्या तयारींत ]

**उदाजी** : कंटाळा झटकून झालं पाहिजे.

**गुणवती** : (तितक्याच ताठरपणानें) वेठीचीं कामं नव्हत हीं !

**उदाजी** : वेठीनं कां, खुशीनं झालीं पाहिजेत.

**गुणवती** : तुमच्या नव्हे, माझ्या !

[ आतां मात्र होना व बाळा पाय काढतात-गुणवतीही तंबोरा कोपऱ्यांत ठेऊन आंत जाऊं लागते. या प्रकारानें उदाजी भडकतो. ]

**उदाजी** : असं काय ? थांब होनाजी, अन् बाळा तूंही थांब. ( हें ऐकतांच गुणवती-ही थांबते. ) होनाजी, सांग म्हणायला हिला. गाणं ऐकल्याखेरीज जाणार नाहीं मी.

**बाळा** : ती म्हणणार, तुम्ही ऐकणार ! आमची अडगळ कशाला मधें ? ( हंसून ) रंगाचा बेरंग उगीच. जातों आम्ही.

**उदाजी** : थांब. असा निसूट जाऊं देतों काय तुला ? गुणवती, चाललीस कुठं ?

**गुणवती** : घरांत.

**उदाजी** : घरांतलं गाणं मग ! आधीं दिवाणखान्यांतलं. नाहीं जायचं घरांत.

**गुणवती** : वा ! नाहीं जायचं म्हणजे ? माझ्या घरीं मला बंदी करणारे तुम्ही कोण ?

**उदाजी** : मी कोण ? अन् तुझं घर ?

**गुणवती** : मग कुणाचं, तुमचं ? सरदार केव्हांपासून राहूं लागले बावनखणींत ?

[ याच वेळीं मोरशेट व यमुना बाहेर येतात. गुणवतीचे हे शब्द आणि चौघांचे चेहरे पाहून चकित होतात. ]

**मोरशेट** : काय, काय म्हणालीस गुणवती ? कुणाला ? उदाजीला ?

**यमुना** : हवा तंग झालेली दिसते. काय रे बाळा ?

**उदाजी** : मी सांगतों कां तंग झाली तें. परभारें त्याला काय विचारतां ? हिच्या मागचे साजिंदे, तसा तो.

[ त्या विशेषणानें होना व बाळा दोघेही प्रत्युत्तराच्या तयारीनें पुढें येतात. पण गुणवती खिडकीकडे पाहून— ]

**गुणवती** : घोडं कां खिंकाळतंय खालीं ?

**उदाजी** : लगाम ढिला पडला म्हणून. पाठीव तुझ्या या खिदमतगारांना कां खिंकाळतंय तें बघायला !

**होना** : ( सामना अपरिहार्य जाणून ) कुणाला म्हणतां खिदमतगार ? उदाजीराव, मर्यादा राखावी, अन् राखून घ्यावी. पण सरदारीच्या तोऱ्यांत ती तुम्ही झुगारून देत असाल तर आम्हांलाही तोंडं मोकळीं सोडावीं लागतील.

**बाळा** : अन् भर बावनखणींत शोभा होईल तुमच्या सरदारीची. तमासगिरांचीं तोंडं आहेत आमचीं, डफावर बोटं ठरत नाहींत, तसे तोंडांत शब्दही ठरत नाहींत आमच्या.

**मोर० :** अरे हो हो! आँ? असे डफघाईत कां सामील झालां सगळेच! उदाजी-राव, काय झालं रे?

**यमुना :** तूं कांहीं उणं आगळं बोललीस कीं काय गुणवती?

**उदाजी :** ती एकटीच नाहीं बोलत! अन् आपल्या मनानं नाहीं बोलत! बोल-विणारे हे दोघे आहेत साजिंदे!

**होना :** सरदार, पुनः सांगतों, जपून बोला. तुम्हांला भांडायचं असेल तें तिच्याशीं भांडा—आम्हांला कां गोंवतां हकनाक! अन् बोलतां याच सुरांत बोलणार असाल, तर आम्ही साफ मुलाहिजा ठेवणार नाहीं हें समजून बोला. संबंध काय तुमचा आमचा?

**मोर० :** होना, तूं जरा गम खा. मी बघतों, घोडं कुठें ठेंचकळतंय तें.

**उदाजी :** तें ठेंचकळतंय हिच्या बेताल वागण्यापायीं. यमुनाबाई, हिची चाल साळसूद आहे, अशी देतां कां गोही?

**यमुना** हें काय बाई आगजाळं विचारणं? उदाजीराव, तुम्हीच आपल्या तोंडानं चालीची बदचाल करूं लागलां तर लोकांच्या तोंडावर हात कुणी ठेवायचा?

**उदाजी :** त्याची नको काळजी! माझी खातरजमा करून द्या म्हणजे झालं!

**यमुना :** म्हणजे? म्हणायचं आहे काय तुम्हांला तें तरी कळूं द्या! अब्रूदार कलावंतिणीचं घर आहे हें!

**उदाजी :** होय आहे, अन् हे दोघे तमासगीर त्या घराचे पहारेकरी आहेत.

**बाळा :** होय आहेत. पण ती तमासगिरी तुमच्या सरदारीसारखी वडिलांच्या पुण्याईनं आमच्या ओट्यांत पडलेली नाहीं. ती आमची कस्त-मेहनतीनं कमावलेली जिंदगी आहे.

**होना :** बिनडाकिल दागिन्यासारखी. तिला कुणाच्या हिमायतीची लाख लागत नाहीं कीं खुशामतीची भर सोसत नाहीं.

**यमुना :** आमचाही धंदा आहे गाण्या-नाचण्याचा. तो यांचा शेजार केला म्हणून नांवारूपाला आला आहे. यांच्या कष्टाचं फळ आहे तें.

**मोर० :** यमुना म्हणते तें खोटं नाहीं, उदाजीराव. होनाजीच्या लावण्या रागदा-रीच्या, सूर खडे अन् लयकारी मन पाघळणारी असल्यामुळें गुणवतीच्या गाण्यावर लोकांची रीझ आहे. होनाजीमुळेंच गुणवतीचा लौकिक श्रीमंतांच्या कानावर गेला आहे.

**उदाजी :** गाण्या-नाचण्याचा धंदा मला समजतो, मोरशेट. पण त्या निमित्तानें हिनें माझ्याशीं बारा-तेरा करावे अन् माझ्या दौलतीच्या आफ्तागिरीखालीं होनाला सावली करून द्यावी, हें मी सहन करावं म्हणतां ?

**यमुना :** काय हें ऊरफाटं बोलणं तरी !

**उदाजी :** माझं बोलणं ऊरफाटं वाटतं, तुमच्या मुलीचं वागणं नाहीं वाटतं ? विचारतां कां तिला ? देतां कां रुजवात करून ?

**गुण० :** कुभांडखोरीशीं रुजुवातीची सोयरीक होत असते कां कधीं ?

**मोर० :** गुणवती, तूं थांब जरा. आम्ही वडीलधारी माणसं आहों ना बोलायला ? हें पाहा उदाजीराव, या गोष्टी कुठें रुजुवातीनं कां उलगडतात ?

**उदाजी :** मग माझ्या दौलतीवर चाललं आहे, असंच आंधळं दळण अखंड चालावं म्हणतां ? नादीं लावण्याचा खेळ आईलेकींनीं फार दिवस चालविला. हिच्या खुशीला कोवळी पालवी फुटावी म्हणून मी फार दिवस वाट पाहिली. खत-पाणी मी घालावें अन् फूल-फळ होनाजीनं लुबाडावं, हें या उपर मला मंजूर नाहीं. मोरशेट, एकच ऐवज एकाकडे नजरगहाण अन् दुसऱ्याकडे कबजेगहाण असा व्यवहार चालतो कां सावकारींत ?

**मोर० :** आलं लक्षांत ! पण व्यवहारा-व्यवहारांत फरक असतो उदाजीराव, करावा लागतो. येथला व्यवहार प्यार-मोहबतीचा आहे. त्याचा फैसला तलवारीच्या धारेनें होणार नाहीं.

**उदाजी :** कां नाहीं होणार ? इभ्रतीचा सरदार आहे मी ! कोणी दिलमळणी करणारा तमासगीर नाहीं. फैसला तलवारीच्या धारेनंच झाला पाहिजे.

**होना :** करून घ्या बेशक !

**बाळा :** हिंमत असेल तर !

**होना :** पण तसं करतांना तमासगिरांच्या मुंडाशाला कां हात घालतां ? फुकट पेंच मात्र गळ्यांत येतील अन् झांकली मूठ उघडी होईल.

**उदाजी :** ऐकलीत यमुनाबाई ही धमकी ? अन् ती तुमच्या आसऱ्यानं, तुमच्या घरांत मोर्चेबंदी करून चालली आहे.

**होना :** आमची नाहीं चालली उदाजीराव ! उलट तुम्ही मात्र हें आपलंच घर समजून चढ्या घोड्यानिशीं आमच्यावर चालून येत आहां. पण लक्षांत ठेवा, या

घरांत आमचं उस्तादगिरीचं मानाचं पान आहे. अन् गाणं—नाचणं हा तिच्या खुशीचा सौदा आहे.

**बाळा** : तसं नसतं तर यानं आपला गळा गाऊन अन् मी आपली बोटं ठेका धरून शिणवायचं कारण काय? गाणं-नाचणं हा अलबत् खुशीचा सौदा आहे. तो तुमच्याच काय पण श्रीमंतांच्या भरल्या जमादारखान्याच्या बदल्यांतहि पटणार नाहीं. पुतळ्यांची एक नव्हे, शंभर माळांची अस्मानगिरी या दिवाणखान्यांत करून दाखविलीत, तरी लावणीची एक कडी ऐकायला मिळणार नाहीं. तुमच्या सरदारीची आणि इभ्रतीची जी कांहीं बूज श्रीमंतांच्या दरबारांत असेल तिच्या सवाईनं आमच्याहि सरदारीची आणि इभ्रतीची कलावंतांच्या दरबारांत आहे. तमासगीर, तमासगीर म्हणून हिणवतां कुणाला? होनाला? तुमच्यासारखे छप्पन सरदार श्रीमंतांच्या दरबारांत आहेत. पण कलावंतांच्या दरबारांत शाहीरांचा सरताज म्हणून होनाचा पहिला मान आहे. होना आज शाहीरांचा तुरा आहे, शाहीरांचा बादशहा आहे.

**मोर०** : बाळा, बाळा, उदंड बोलतोस. मर्यादा सोडून बोलतोस—

**होना** : मर्यादा सोडली कोणी? सरदार म्हणवितात हे. इभ्रतीची राळ उडवितात. यांनीं नको सांभाळायला? दौलतीच्या गोणी घेऊन लंपटपणानं आम्ही नाहीं आलों, हिच्या दाराशीं? त्यांतून यमुनाबाईनीं नाखुशीची नुसती भुवई उचलून बघावी एकदां. आम्ही या घराची पायरी चढणार नाहीं.

**उदाजी** : आवेशाच्या भरांत शाहीरांचे बादशहा जबान तर खूब औरस-चौरस बोलून गेले. पण ती कुणाच्या भरंवशावर! या नाजूक शागीर्दाच्या कीं डेंगळे पाटलांच्या?

**बाळा** : पाहा कौल घेऊन एकदां!

**यमुना** : हिच्या वर्तीनं मी भरंवसा देतें, उदाजीराव.

**उदाजी** : कौल नको घ्यायला. कारण ज्याच्या पाठपुराव्यानं तुमचं वळण श्रीमंतां-पर्यंत लागून गेलं ते डेंगळे पाटील याउपर उजळ माथ्यानं पुनः दिसणार नाहींत.

**मोर०** : काय म्हणतोस?

**उदाजी** : डेंगळे पाटील बंड झाले. इंग्रजाच्या सौरस्याकरितां श्रीमंतांनीं त्यांच्यावर हत्यार धरलं. त्यांचे आश्रित म्हणून श्रीमंताच्या दरबारीं आजवर तुमचा गैरवाजवी राबता झाला. देशांतला कोणताही सामनेवाला तमासगीर तुम्ही ठरूं दिला नाहीं.

**बाळा** : अन् डेंगळे पाटलांचा आसरा तुटला म्हणून ठरूं देऊं कीं काय? तुमची सरदारी असेल धन्याच्या मर्जीवर तशी आमची डफ-तंबोरी नाहीं. उगीच शाहीराच्या दरबाराची उस्तवारी कां करतां?

**होना** : अन् शाहीरी काय कुणाच्या मर्जीवर भरवंसून चालते काय? आमच्या शाहिरीचे चहादार आमच्या भोंवतीं कडें घालून उभे आहेत तोंवर आम्हांला कुणाची रदबदल करण्याचं कारण नाहीं.

**उदाजी** : ठीक आहे. तो माणेदशी राघूचा तमाशा चढ ठरून तुमच्या डफ-तंबोरीला गवसणी घालण्याचा एक दिवस उगवेल. काळजी नका करूं. चालेल तोंवर चढेलपणाचा अमल जरूर चालवून घ्या. पण त्या जोरावर इथें वर्दळ करण्याचं कारण नाहीं. यमुनाबाई. तुम्ही आपल्या मुलीचा भरंवसा दिला तसे यांनाहि निरोपाचे विडे द्या.

**यमुना** : यांना निरोपाचे विडे?

**मोर०** : उदाजीराव, जोडायला उशीर लागतो, तोडायला नाहीं लागत.

**यमुना** : तेंच म्हणतें. तुम्ही तर तोडायला निघाला.

**उदाजी** : होय.

**यमुना** : श्रीमंतांपुढें गुणवती रुजु होण्यापूर्वींच? मग तिनं आतांपर्यंत धरलेल्या ईर्षेचा उपयोग काय? या दोघांनीं हाताशीं धरून आणलेल्या लौकिकाचं फळ काय? होनाजींनं एवढ्या अपरूपानं रचलेली भूपाळी गुणवती श्रीमंतांपुढं म्हणून दाखविणार आहे तिची वाट काय? उदाजीराव, कोटाची भिंत एकेका दगडाच्या रचाईनं उभी राहते, पण तोफेच्या एका गोळ्यानं कोसळून पडते. रोज सांजसकाळ हिनं गळा घासून मेहनत केली ती तुमच्या मनाईनं मातीमोल होणार, याचा कांहीं विचार केलांत? अन् तिची चहा श्रीमंतांनीं केली तर अभिमानाला जागा कुणाला होईल? तुम्हांलाच! नी तुमची कळावंतीण म्हणून!

**उदाजी** : अन् तिची चहा करीत असतां श्रीमंतांची लोभाची नजर तिच्यावर ठरली तर अभिमानाच्या बदल्यांत ती माझ्या हातची सुटेल याची काय वाट? नाहीं यमुनाबाई, गुणवतीला मी अशी गंगेंत सोडायला तयार नाहीं. भले माझ्या अभिमानाला श्रीमंतांचे पाय नाहीं लागले तरी चालतील. पण श्रीमंतांकडून मिळणाऱ्या बिदागीवर तुमचा हेतु जडला असेल तर तिच्या दसपट, नव्हे शंभर-

षट बिदागी मी इथें मोजायला तयार आहे. गुणवतीला बिदागीसाठीं गाण्याची जरूरी काय ? अन् श्रीमंतांपुढं रुजू होण्याचं कारण काय ?

**बाळा** : (उपहासानें) मोहरा-पुतळ्यांच्या पलटणी उशापायथ्याशीं उभ्या आहेत जशा. मागतेकऱ्याला घातलेला तुकडा तशी कलावंतांना बिदागी, इतकाच अर्थ कळतो यांना. चल होना, मोतीचारा हंसांना, कावळ्यांना काय त्याचं ! यांनीं काय करावी गुणाची कदर !

**गुण०** : थांबा होनाजीराव, बाळा थांब जरा. उदाजीराव, गाणं-नाचणं बिदागी-साठीं असत नाहीं अन् बिदागीसाठीं श्रीमंतांपुढं रुजू होण्याचं कारण नाहीं. बिदागीच्या रूपानं मोहरा-पुतळयांचं शिंपण याच दिवाणखान्यांत मी उभी राहिलें तरी माझ्यावर होतं. पण गाणं-नाचणं हा माझा छंद आहे. माझ्या जिवाचा ध्यास आहे. तो ( होनाकडे बोट दाखवून ) यांच्या शागीर्दीनं मोहोरला आहे. अन् आतां त्याचं चीज श्रीमंतांची वाहवा मिळवून होणार आहे. कदरदान भेटला म्हणजे गुणाचा चाफा कसा परिमळतो, हें तुम्हाला कसं कळणार ! तें सांगा यांना मोरशेटजी, सांगतां आलं तर ! आई ( होनाजीकडे बोट करून ) यांना दूर करून तूं माझ्या जिवाचा कोंडमारा करणार तें काय म्हणून ? माझे पंचप्राण गाण्यानाचण्यांत गुंतले आहेत. ते तूं यांच्या ( उदाजीकडे बोट दाखवून ) इष्कासाठीं बळी देणार आहेस काय ? बिदागीची वैरण माझ्यापुढे टाकून तूं मला यांच्या गोठ्यांतलं जनावर बनविणार आहेस काय ? माझ्या गाण्या-नाचण्याला बुरखा घालून तूं मला यांची पडदानशीन बिबी करणार आहेस काय ?

**यमुना** : थांब जरा गुणवती. कळतं मला तूं काय म्हणतेस तें. उदाजीराव, तुमच्या ताबेदारीचा पाहारा इतका कडक असेल असं मला वाटलं नव्हतं. गाणं-नाचणं बंद करून हिला बंदिस्त ठेवायची म्हणतां ?

**उदाजी** : होय, ती भापकरांची कळावंतीण म्हणून नांदायची आहे. गांवची म्हणून नाहीं.

**गुण०** : वा ! म्हणजे मला काय लग्नाची बायको समजतां ? ती देखील तुमची जप्ती चालू देणार नाहीं इतकी.

**उदाजी** : ( हंसत ) यमुनाबाई, पाहिलीत ही गव्हाळी नागीण कशी धुसफुसते आहे ती !

**यमुना** : जुलुम झाला बाई ! तिच्या छांदिष्टपणाची एक परी. यांची ही दुसरी !

**होना** : पण त्यामागं त्यांच्या अवघ्या दौलतीची प्रभावळ आहे ना? त्यांची कट्यार देखील तिख्याची नाहीं, सोन्याची आहे. परवडलं तर सोयरीक करून तुम्ही बसा कौतुक करीत. आमच्या मानाला तें पुरवत नाहीं. येतों आम्ही, राम राम. ( जाण्यास निघतो. )

**गुण०** : होनाजीराव, कुणावर रागावतां अन् कुणाची सोड करतां? तुमच्या मानाला पुरवत नाहीं, तें माझ्या मनाला तरी कसं पुरेल?

**यमुना** : ( होनाजीबरोबर निघालेल्या बाळास ) बाळा, तूं देखील निघालास?

**बाळा** : मी देखील म्हणजे? होनाला जागा नाहीं. तिथें बाळालाही नाहीं.

**यमुना** : त्यांचा राग होनावर दिसतोय. तूं कां आपल्या अंगीं लाऊन घेतोस?

**बाळा** : मानाचं पान मानानंच राहिलं पाहिजे, असं मी सांगितलं होतं तें जमलं नाहीं तुम्हांला. त्याच्या पानावेगळं माझं पान नाहीं. कारण त्याची माझी हयात गळ्यांत गळा घालून चालली आहे. तशीच मौतही जमल्यास एकाच ताटीवरून जायची आहे. आमची मैत्रिकी सूर तिथें गळा अन् होना तिथें बाळा अशी लोक सादवितात, माहीत नाहीं कां तुम्हाला?

**गुण०** : ( रस्त्यावरील खिडकीशीं जाऊन ) सूर तिथें गळा अन् होना तिथें बाळा! ( जिन्याकडे वळणाऱ्या बाळास विव्हळतेनें ) बाळा, माझ्या गळ्यांतला मणी तुटला. माझा गळा उघडा पडला. अन् तूं पाठमोरा होऊन चाललास?

**बाळा** : नाहीं गुणवती. तुझी माझी पुण्याई उभी राहिली तर तुझा भरलेला गळा पाहायला माघारीं येईन.

[ जावयास निघतो. पण गुणवतीकडे पाहून त्याचा पाय उचलत नाहीं.]

**गुण०** : ( दुःखातिशयानें ) सूर तिथें गळा अन् होना तिथें बाळा! तिथें गुणवतीला थार नाहीं? आई मला कळावंतिणीचा जन्म देऊन तूं सटवीच्या रात्रीं ज्योत मालविलीस अन् माझ्या कपाळीं असा अंधेर लिंपलास काय? ( यमुना तिच्या शांतवनासाठीं जवळ जाऊन तिला उराशीं धरते आणि आंत नेऊं लागते.)

**उदाजी** : यमुनाबाई हें दर्द गाण्या-नाचण्या पुरतंच असेल तर आतांच्या आतां दुसरा कोणी उस्ताद बघा. एकटा होनाजीच कांहीं दुनियेची गायकी गिळून बसला नाहीं. त्याच्यासारखे छपन्न शाहीर गुणवतीच्या गळ्यावर न्याहाल होऊन येतील.

**गुणवती** : येतील. पण एकालाही होनाजीरावांची सर येणार नाहीं.

**उदाजी** : यमुनाबाई, ऐकलांत हा कबुलीजबाब ? गाण्या–नाचण्याच्या कसबाखालीं तुम्ही दोघींनीं अन् शाहिरीच्या अस्तराखालीं या दोघांनीं माझी नाकेबंदी करायचा घाट घातला होता काय ? बस्स, यापुढें माझ्या अवध्या दौलतीची उधळमाधळ झाली तरी बेहत्तर, हिला मी माडीची पायरी उतरूं देणार नाहीं. अन् (होना–बाळाकडे बोट दाखवून) यांना—

[श्रीमंतांचा चोपदार मदनसिंग येतो. तो दरवाजांतच होना–बाळाला पाहून हंसतो. हें पाहून उदाजी तोंड फिरवितो. मदनसिंग पुढें येतो.]

**मोरशेट** : मदनसिंग ? श्रीमंतांकडून आलास ?

**मदनसिंग** : होय शेटजी, गुणवतीला गाण्याची वर्दी द्यायला.

**यमुना** : गुणवतीला गाण्याची वर्दी ?

**मदनसिंग** : श्रीमंतांकडे आल्पिष्टण साहेबाला मेजवानीचा बेत आहे आज.

**गुणवती०** : आज ?

**मदनसिंग** : प्रहर रात्रीला. (जातां जातां होनाजीस) शाहीर येतीलच. (बाळास) अन् बाळाभाऊ तुम्हीही.

**होनाजी** : हो येऊं.

**बाळा** : (उदाजीला उद्देशून पण त्याच्याकडे न पाहतां) पण गुणवतीचं कसं काय ?

[उदाजी कोणाकडेहि न पाहतां पाय आपटीत जातो. त्याच्याकडे पाहात]

**मदनसिंग** : कां ?

**मोरशेट** : (बाळाला नजरेनें दाबीत) कांहीं नाहीं. वर्दीप्रमाणं येईल गुणवती.

[मदनसिंग जातो. गुणवती अंगांत नवचैतन्य संचारल्यासारखें करीत यमुनेला मिठी मारते आणि तिच्या एका खांद्यावर हनुवट ठेवून गदगदून म्हणते 'आई'. तसेंच दुसऱ्या खांद्यावरून म्हणते 'प्रहर रात्रीला.' नंतर मिठी सोडून ती प्रथम आंतून आली होती त्या वेळच्या बेहोशपणानें होनाजीकडे पाहात आणि त्याला हातानें भाळवीत म्हणते—" कधीं येशील, भेटशील, प्रीत तपशील सांगशिल तरी ' ]

[पडदा]

: ३ :

## प्रवेश पहिला

[ कांहीं वर्षानंतर. मोरशेटजींचा दिवाणखाना. मोरशेट डोक्यावर पागोटें ठेवून आणि खुंटीवरील दुपेटा खांद्यावर टाकून बाहेर जाण्याच्या तयारींत आहेत तोंच भिकाजीपंत खिडकींतून वारा यावा तसा अनाहूतपणें येतो. मोरशेट कांहींशा विमनस्कतेंत असल्यामुळें भिकाजीपंतांचें येणें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. ते कोपऱ्यांतली काठी हातीं घेऊन क्षणभर खिडकींतून रस्त्याकडे पाहातात आणि निघण्याचा बेत ठाम करून जिन्याच्या तोंडाशीं जातात. हें पाहून आपली दखल देण्याच्या उद्देशानें भिकाजीपंत बळेंच खांकरतात. ]

**भिकाजी** : मोरशेट ? ( हांक ऐकतांच मोरशेट वळून पहातात ) निवांत भेट होईल म्हणून आलों होतों. ( मोरशेट कांहींच उत्तर न देतां रोखून पाहातात ). बाहेर निघाला वाटतं ? अशा अवेळीं ?

**मोर०** : ( भिकाजीपंतावरील दृष्टी फिरवून ) सगळ्या सुवेळा श्रीमंतांबरोबर मावळल्या आहेत, भिकाजीपंत. आतां अवेळ नी अकाळ मसुद्यावर देखील शिल्लक नाहींत. कंपनी सरकारचं राज्य झालं आहे ना ? ऐन बारा वाजतां कोडताचं बोलावणं येतं.

**भिकाजी** : पंचायतीचं बोलावणं तें. टाळतां कसं येईल ? आपला संभावितपणा नव्या अमदानींत इतका राजमान्य व्हावा, ही एक अभिमानाला जागा झाली आम्हांला.

**मोरशेट** : तुमच्या अभिमानाला जागा झाली, पण आमच्या संभावितपणाला ओळंबे लागायची वेळ आली ना ?

**भिकाजी** : ( अंग चोरून ) असं काय झालं एकाएकीं ?

**मोरशेट** : श्रीमंतांच्या तख्तावर साहेब बसल्यानं जें व्हायचं तेंच झालं. व्हायचं काय दुसरं? नरमीना शालीची भरडी धाबळी झाली. उद्यां तिनं जबरदस्तीला शह देण्यासाठीं कोडताची साउली पाहिली, म्हणजे पंचायतीचे पेंच आमच्या गळ्यांत येतील कीं नाहीं?

**भिकाजी** : मला कळलं नाहीं कुणाबद्दल काय म्हणतां तें?

**मोरशेट** : म्हणतो उदाजीरावाबद्दल. शेजेला लागलेल्या जखमा उकलल्या आहेत ना त्यांच्या. यमुनेच्या घरीं जाऊन उमेदींतला रंग भरूं पाहतोहेत. हें तिला नी गुणवतीला मंजूर नाहीं. अन् हे त्यांची नामंजुरी मानायला तयार नाहींत.

**भिकाजी** : असं असं! म्हणजे त्या कळावंतिणीच्या घरचा प्रकार सांगतां! मग त्याची झळ त्यांच्या राहत्या घरापर्यंत कशी पोंचली आहे, हें सांगायला मी आलों आहे.

[ हें ऐकतांच मोरशेट पूर्ववत कोपऱ्यांत काठी ठेवतात आणि बैठकीवर जाऊन बसतात. ]

**मोरशेट** : आतांपर्यंत सरदांराच्या तैनात-सरंजामाच्या घालमेली कोडतांत चालल्या होत्या. यापुढें ही घरगुती रकटीं वेशीवर येणार म्हणायचीं! बरं झालें रंभाजीरावांनीं लौकर डोळे मिटले ते.

**भिकाजी** : मात्र त्यांच्या पश्चात उदाजिराव इतक्या लौकर उधळतील असं वाटलं नव्हतं.

**मोरशेट** : वाटच पाहात होते. रंभाजीरावांच्या अस्थी गंगेच्या तळाशीं तरी पोंचल्या कीं नाहीं कोण जाणे!

**भिकाजी** : तैनात-सरंजाम होता, तेव्हां शोभलं असतं हें. आतां घरचं खटलं रुइखुईनं आवरायची पंचाईत अन् कळावंतिणीच्या घरीं राबता?

**मोर०** : कंपनी सरकारची पेनसील चालू आहे ना?

**भिकाजी** : चालू आहे म्हणजे काय मोरशेटजी? शेतमाल काढून नेल्यावर लांगालुंगा गोळा करावा, त्यांतला प्रकार! सरदारीची भिकबाळी कुठें अन् पेन-सलीचं सुकलं कुठें!

**मोरशेट** : पेहेलवानागिरीचा कस उतरला तरी चढून गेलेल्या कानाचा बत्तासा चिकटून राहतोच जन्मभर. त्या जोरावर लाल माती उधळीत रहायचं. तशी सरदारीची राळ उडवून पाहताहेत उदाजीराव, दुसरं काय ?

**भिकाजीपंत** : पण गुणवतीनं नाकारलं म्हणता तरी ?

**मोरशेट** : नाकारलं म्हणून हट्टाला पेटले आहेत. डुक्कर खळीला आला म्हणजे त्याला चेपणं अवघड असतं, भिकाजीपंत.

**भिकाजीपंत** : सांगून पाहिलंत कां तुम्ही ?

**मोरशेट** : सांगून पाहायला भेटायला तरी हवेत.

**भिकाजीपंत** : भेटतही नाहींत ?

**मोर०** : मागें श्रीमंतांनीं गुणवतीचा निवाडा होनाजीच्या बाजूनें केला, तेव्हां मी उदाजीरावांच्या वतीनें रदबदली करावयाला हवी होती, असं त्यांचं म्हणणं. ती मी केली नाहीं. तो राग धरून आहेत माझ्यावर. तेव्हांपासून दारावरून गेले तरी मुरडून पहात नाहींत ते. मग भेटायचं लांबच राहिलं. तुम्ही सांगता का त्यांना ?

**भिकाजीपंत** : भेटायला ? सावत्र आईशीं वडिलांच्या हयातींतच ते तेढीमेढीनं वागत होते. अन् आतां ब्रम्हावर्ताहून आल्यापासून तर पुसूंच नका. हजार वाटांनीं दुस्वास दाखविताहेत. तरी पण पाहतों सांगून. ऐकून तरी घेतील कीं नाहीं कोण जाणे. बरं, आपण केव्हां येणार घरीं ! आपल्या सल्ल्यानंच काय तें ठरवूं असं बाईचं म्हणणं आहे.

**मोरशेट** : येईन म्हणून सांगा चार दोन दिवसांत.

**भिकाजीपंत** : ठीक आहे. येऊं मी ?

[भिकाजीपंत नमस्कार करून निघतो. तोंच गुणवती येते. तिला पाहून भिकाजीपंत थबकतो.]

**मोरशेट** : कां आलीस गुणवती ? (पण गुणवती उत्तर न देतां आंतील दरवाजापर्यंत जाते. तेव्हां थबकलेला भिकाजीपंत जातो. त्याला पोचवून परत येतांना मोरशेट पुनः एकदां विचारतात.) कां आलीस ग अवचित ? तूंच आलीस कीं आईनं पाठविलं ?

**गुण०** : आतां आईहून मी कांहीं वेगळी नाहीं. आईच्या मसलतीनंच आल्यें.

**मोर०** : उदाजीरावाची कागाळी सांगायला ?

**गुण०** : नुसती कागाळी नाहीं, त्याचा कायमचा बंदोबस्त कसा काय करायचा हें विचारायला आल्यें.

**मोर०** : तें माझ्या ऐवजीं होनाजीला कां विचारीत नाहींस ?

**गुण०** : विचारलं असतं. पण ते गेले आहेत सासवडाला. अन् उदाजी तर कमानीला तीर लावून बोलतो आहे.

**मोर०** : बोलणारच ! मोडलेली वाट मोकळी करून दिल्यावर कां नाहीं बोलणार ?

**गुण०** : पण कळावंतिणीच्या घराच्या वाटा मोकळ्या कां करून द्याव्या लागतात ?

**मोर०** : म्हणून कोणी एकाएकी कमानीला तीर लावून बोलणार नाहीं. तितकी मजल जायला कांहीं कारण लागतं.

**गुण०** : कारण काय लागायचं, निमित्ताला टेकलेल्या माणसाला! सकाळ-संध्याकाळ धरणं धरून बसला तेव्हां आईनं एक भलीथोरली दागिन्यांची याद त्याच्या अंगावर टाकली, कटकट मिटावी म्हणून.

**मोर०** : अन् कटकट घरांत घेतली.

**गुण०** : तेंच तर चुकलं ! आईला वाटलं कीं तो आतांच्या खालावलेल्या स्थितींत वर मान करणार नाहीं !

**मोर०** : असा काय यादीचा दगड दिला त्याच्या डोक्यावर ?

**गुण०** : अगदीं पायांतल्या तोड्यापासून डोक्यांतल्या चंद्रकोर-केवड्यापर्यंत, चुकती यादी आठवून-आठवून सांगितली होती.

**मोर०** : अन् आतां नाहीं का म्हणतेस ?

**गुण०** : हें काय विचारणं तुमचं ?

**मोर०** : अग, प्रसंगानंच विचारणं येतं. आतांपर्यंत कुठं विचारलं नव्हतं तें ! समजूनच चाललों होतों.

**गुण०** : मग तेंच बरोबर आहे. त्याच्या दागिन्यांचं ओझं वाहायला मला काय उणं झालंय ! माझ्या दारीं सळसळतो आहे सोन्याचा पिंपळ !

**मोर०** : अस्सं ? तूंच लावलास वाटतं ? कीं होनाजीनं ?

**गुण०** : त्यांनीं लावला, अन् मी वाढविला.

**मोर०** : चांगलं केलंत ! आतां त्या पिंपळावर तो येणार आहे मुंज्यासारखा !

**गुण०** : येतोय ! कसा येतो बघत्यें.

**मोर०** : आलाच आहे त्या दागिन्यांच्या यादीची शिडी करून. पंचाक्षरी बघून ठेव म्हणजे झालं ! पण काय ग, येईना आला तर ! दागिने तर पदरांत पडतील !

**गुण०** : म्हणजे कळावंतिणीला कशाची चाड असूंच नये कां अगदीं ?

**मोर०** : असावी ग !

**गुण०** : अन् सरदार म्हणवितात ते, त्यांनाही असूं नये कां ?

**मोर०** : असती तर अशी वेळ कां येती ? म्हणून आतां तूं होनाजीच्या येण्याची वाट वाहात बसूं नको. टाकोटाक निरोप धाड त्याला. व्हायचं असेल तें होनाजीच्या देखत होऊन जाऊं दे.

**गुण०** : पण तुम्ही अंगाबाहेर टाकूं नका.

**मोर०** : माझ्या सांगण्यानं कां तो ऐकणार आहे ? पण पाहूं, त्याला भीड पडेल अशा चार संभावित माणसांकडून सांगून बघूं. नादावलेला माणूस तो. देवाला सुद्धां दगड म्हणेल. तुझा खरा पाठीराखा आतां होनाजीच.

**गुण०** : पण मी कसा धाडूं निरोप ? माणूस मिळाला पाहिजे.

**मोर०** : तें देखील मीच करावं म्हणतेस ? बरं करतों जा. ( असें म्हणतांना खिडकींतून रस्त्यावर पाहात.) अरे, पण हा कसा आला अवचित ?

**गुण** : कोण ? ( उत्सुकतेनें हंसत खिडकीकडे जात ) होनाजीराव ?

**मोर०** : ( खिडकीकडे पाहात ) नव्हे, उदाजीराव.

**गुण०** : ( धक्का बसल्या सारखी थबकून गोरीमोरी होऊन, मोरशेटांकडे पाहात, तोंडावर हात ठेवून ) अग बाई ! ( आणि लगेच पाठ करून आंतील दरवाजाकडे धांवत ) जाते मी ! ( पण दरवाजापर्यंत जातांच फिरून निश्चयी स्वरानें ) नाहीं जात ! इथेंच सांगतें त्याला तुमच्या समक्ष. केव्हांतरी सांगायला हवंच आहे.

**मोर०** : ( किंचित् विचार करून ) नको. होनाजी आल्याशिवाय नको. आतां जा तूं. मी माणूस धाडतों. ( गुणवती जाते. मोरशेट क्षणभर काय करावें असा विचार करून बैठकीवर बसतो. पेटीतून मोत्यांची पुरचुंडी बाहेर काढतो आणि ताजव्यांत मोती टाकीत असतां उदाजी येतो. तो येतांच दिवाणखान्याभर नजर फिरवितो. आंतील दाराकडेहि पाहतो. मोरशेट त्याची नजर हेरीत कांट्याकडे लक्ष पुरवीत ) या उदाजीराव ! ( ताजव्यांतले मोतीं हातांत घेऊन पुनः पुरचुंडी

बांधीत) फारां दिवसांनीं येणं केलंत ? ( पेटी उघडून पुरचुंडी आंत ठेवीत ) केव्हां आला ब्रम्हावर्ताहून ?

**उदाजी** : ( साशंकित नजर फिरवीत ) झाला महिनाभर !

**मोर०** : म्हणजे होनाजी सासवडाला गेला अन् तुम्ही इकडे आलां असं दिसतंय !

**उदाजी** : ( होनाजीचें नांव ऐकतांच चवताळून ) गुणवती आली होती कां इथें ?

**मोर०** ( औपचारिकपणा टाकून ) आली होती. ( रस्त्याकडे पाहात ) पण गेली घरीं. ( उदाजीस ) कां ?

**उदाजी** : हुलकावण्या दाखविते आहे वाटतं ! घरीं गेलों तर इकडे आली अन् मी इथें आलों तर ती घरीं गेली काय ?

**मोर०** : तुम्ही गेलां होतां तिच्या घरीं ? कशाला ?

**उदाजी०** : कशाला ? कळावंतिणीच्या घरीं कशाला जातो माणूस ?

**मोर०** : सांगू का ? पैशाची ऊब घरीं सोसेनाशी झाली म्हणजे माणूस कळावंतिणीकडे जातो.

**उदाजी** : तेवढ्यासाठींच नाहीं. एकदां निसटलेली शिकार पुनः साधण्यासाठीं.

**मोर०** : ती पुनः साधतेच असं नाहीं.

**उदाजी** : कां नाहीं साधत ?

**मोर०** : रान उठविल्यामुळं जनावर सावध राहतं. रहाळ सोडून निघून तरी जातं. दुसरीकडे ! अशा वेळीं शिकाऱ्यानं नाद सोडावा.

**उदाजी** : हें तुम्ही सांगतां कां मला ?

**मोर०** : कोणीही शाबूद डोक्याचा माणूस हेंच सांगेल. अन् डोक्याचा शाबूद असेल तो ऐकेलही.

**उदाजी** : पण सावजाचा वास कोणी लावून दिला ?

**मोर०** : असं असं ! फार जुनी गोष्ट सांगतां ही !

**उदाजी** : गोष्ट जुनी असली तरी, आंच ताजीच आहे.

**मोरशेट** : त्या ताज्या आंचेला जुनी गुणवती कशाला ? बावनखणीच्या पागेंत ताज्या गोमाशा पुष्कळ घोंगावताहेत. पैशाची ऊब मात्र पाहिजे.

**उदाजी** : फुकट सौदा करायला निघालों नाहीं मी !

**मोरशेट** : त्याला पैसाही ताजाच लागतो. सांठवणीचा पैसा पुरा पडत नाहीं.

**उदाजी** : गुणवतीसारखेच भिकाजीपंतही येऊन गेले वाटतं ? अचूक माहिती लागलेली दिसते तुम्हांला ?

**मोरशेट** : खरी आहे कां ती ?

**उदाजी** : सांगायलाच पाहिजे ?

**मोरशेट** : मर्जी असेल तर ! आतां रंभाजीराव नाहींत. तेव्हां मलाही लक्ष घालण्याचं कारण नाहीं. पण श्रीमंत असते तर रंभाजीरावांच्या पश्चात् त्यांच्या कुटुंबाला रांडरोटी मिळाली असती. ती आतां कंपनी सरकार काय देणार ! सरदारीच्या थाटांत दिवस काढलेल्या बाईंना शिळी भाकरी ताकाबरोबर गोड करून खायची पाळी येऊं नये, असं वाटतं इतकंच !

**उदाजी** : त्याची तजवीज त्यांनीं निम्या पेनसलींत करावी.

**मोर०** : अन् तुम्हीं मात्र रंभाजीरावांनीं स्त्रीधन म्हणून राखून ठेवलेल्या जिंदगीचा खुर्दा कळावंतिणीच्या शोकांत करावा काय ?

**उदाजी** : कळावंतिणीचं घर दाखवून शोकाचा विडा कोणी देवविला ?

**मोर०** : तो रीत सोडून शोक करायासाठीं नव्हे. शिवाय–तेव्हां तुमच्या पडदळयांत चालत्या सरदारीची तलवार लटकत होती. आतांसारखं मुर्दाड म्यान नव्हतं.

**उदाजी** : म्यान अगर म्यानासकट तलवार ! मी गुणवतीचा शोक पुरा करणार !

**मोर०** : करा ! मुद्दाम मला येऊन सांगण्याचं काय कारण ? कीं माझी परवानगी मागायला आलां ?

**उदाजी** : ( तुच्छतेनें ) तुमची परवानगी ? होय, परवानगी ! देतां ?

**मोर०** : दिल्या न दिल्याचं मानतां ?

**उदाजी** : न देण्याचं कारण ? तुमचं लक्ष माझ्याहून गुणवतीकडे अधिक कीं त्या होनाजीकडे ?

**मोरशेट** : लक्ष तुमच्याकडेच अधिक, उदाजीराव.

**उदाजी** : मग गोष्टी चांगल्या परिणामाला लागाव्या म्हणून गुणवतीला हुलकावण्या थांबवायला सांगा.

**मोरशेट** : अन् मी तुम्हांलाच थांबायला सांगितलं तर ! गुणवती आतां स्वतःची मुख्त्यारीण आहे. तिनं आपल्या मर्जीप्रमाणं कोणाशीही घरोबा करावा.

**उदाजी** : म्हणजे होनाजीशीं. अन् तो आईच्या मसलतीनं ! मग यमुनाबाईंनीं लेण्या–लुगड्याची भरघोस यादी स्वतःसाठीं सांगितली काय ?

**मोरशेट** : तिची हौस तुम्ही पुरविणार असाल तर कां सांगूं नये ? जातीची कळावंतीणच आहे नी. शोककरणाराची ऐपत ओळखणारी आहे.

**उदाजी** : तिनं काय ओळखावी माझी ऐपत ? सांगितलेली किंमत मोजून घ्यावी.

**मोरशेट** : मोजून तर घेईलच. खोट आली तर मोहरा फिरवायला सांगेल.

**उदाजी** : अशी खोट खाण्यासाठीं घरादाराकडे पाठ फिरविली नाहीं मी.

**मोर०** : इतका निकर एका पाठमोऱ्या झालेल्या कळावंतिणीसाठीं ? उदाजीराव, मराठशाहीची दौलत पाठमोरी होत असतांना इतका निकर दाखविला असता, तर आज श्रीमंत ब्रम्हावर्ताला जाऊन बसले नसते. दर्याची मुशाफरी करणारा टोपीकर शेर झाला नसता. आतां झाल्या-गेल्याला गवसणी घाला नी घराण्याची इभ्रत सांभाळून राहा. तें सोडून भलत्या ठिकाणीं वीरश्री दाखविण्याची काय दुर्बुद्धी झाली तुम्हांला ?

**उदाजी** : जिथें श्रीमंतांच्या इभ्रतीची राखुंडी झाली तिथें आमच्या इभ्रतीची शान काय सांगतां मला ? आतां कोणाची मुर्वत ठेवून इभ्रतीची राखणदारी करायची ? एक वेळ श्रीमंतांच्या मर्जीखातर नी दाजींचा शब्द ओलांडूं नये म्हणून ती केली होती. गुणवतीची लागलेली नोक सांवरून केली होती. तेव्हां चवरी-आफ्तागिरीला वाव होता, लिभास घालून मिरवायला ठाव होता. काय राहिलं आहे आतां ? आमच्या कर्तुकीचा दिल्लीदरवाजा देवडीसकट कोलमडून पडला अन् त्या खालीं आमच्या वीरश्रीचा चिंधीचोळा झाला. सांवरून धरलेली नोक फुटून वाहूं लागली. मोरशेटजी, सावकारीच्या थंड्या साउलींत बसून तापलेल्या रक्ताची आग तुम्हांला काय कळणार ?

**मोर०** : आधीं आपल्या सापत्न मातुश्रींची तरतूद करा नी वडिलांचं कर्ज-वाम वारून टाका. त्यानंतर तापलेल्या रक्ताची आग शिल्लक राहिली तर माझ्याकडे या. मी घेतों जिम्मेदारी त्या आगीचं शांतवन करायची.

**उदाजी** : सापत्न मातुश्रींच्या तरतुदीपेक्षां वडिलांचं कर्ज-वाम ही गोम दिसते तुमची. ठीक आहे. गुणवतीच्या हुलकावण्या तुमच्या कर्जापायीं चालल्या असतील तर-

**मोर०** : कर्जफेडीसाठीं मी असला सौदा करायला तयार नाहीं. मी कर्ज दिलं तें रंभाजीरावांना. त्यांच्या स्नेहाखातर. तें तुम्ही फेडाल या अपेक्षेनं नव्हे. अन् अशा सौद्याच्या बदल्यांत तर मुळींच नव्हे. तुमच्या शब्दाखातर अवांतर कर्जाचे लाखो

रुपये बुडतांना मी उघड्या डोळ्यांनीं पाहिले आहेत. तिथें स्नेहाच्या रीतीला सोडून कर्ज उगवून घेण्याची माझी इच्छा नाहीं. इतकंच नव्हे, तर सरदारीची खचणारी इमारत तुम्ही डोकं देऊन सांवरणार असाल तर अजूनही त्या कर्जात भर घालायला मी तयार आहे. गोष्टी चांगल्या परिणामाला लागाव्या अशी तुमच्यासारखीच माझीही इच्छा आहे. अन् त्या लागतीलही. तुम्ही रीतीनं राहायचं ठरविलं तर ! गुणवतीचं नांव सोडीत असाल तर !

**उदाजी :** सोडलं असतं ! ती माझ्यासारख्याच दुसऱ्या कोणा इभ्रतदाराची राहती तर ! पण होनाजीसारख्या एका तमासगिरानं घेऊन तिला मिरवावं ? कारळ्याची चटणी सुरेख होते, मोरशेट. खीर होत नाहीं.

**मोर० :** एकूण गुणवतीनं कोणाशीं सलगी करावी ही नोक तुम्हांला लागलेली दिसते. इभ्रतदाराशीं कीं तमासगिराशीं ! पण हा तुमचा नव्हे, तिच्या खुशीचा सवाल आहे. तुमच्या हिशेबानं इभ्रतदारी सरदारीशीं जुगलेली आहे. पण तमासगीर देखील किती इभ्रतदार असतो हें होनाजीनं आपल्या सूतबंद चालीनं जगाला पटवून दिलं आहे. तुम्हीं त्याला कारळ्याची चटणी म्हणा हवं तर ! पण तीच गुणवतीला आवडत असेल तर तिला खिरीचा घास देणारे तुम्ही कोण ?

**उदाजी :** मी कोण ? मोरशेट, मला वाटलं हिऱ्यामोत्यांप्रमाणं इभ्रतीचीही तुम्हांला पारख असेल. ( कशाची तरी आकस्मिक आठवण झाल्यावरून मोरशेट पेटी उघडतात आणि तींतून एक जरीची पिशवी बाहेर काढून तिचे गोंडेदार बंद सोडूं लागतात. ) म्हणून माझ्या वतीनं चार शब्द बोलून गुणवतीचं आडवळण तुम्हीं मोडावं, हें सांगायला मी आलों होतों. पण तुमच्या पोटीं माझा नाहीं—त्या तमासगिराचा अन् त्याच्या नादीं लागलेल्या त्या चंढेल कळावंतिणीचा कढ उतू चालला आहे.

**मोरशेट :** अंदाज चुकला तुमचा. माझाही चुकला. मला वाटलं रंभाजीरावांच्या पश्चात् सरदारी तर नाहींच, निदान धरबसल्या संभावितपणा तरी राखून राहाल. पण नाहीं. आतां ही घ्या तुमच्या जन्मदात्या मातुश्रींची मोत्याची गळसरी ! दुर्दैवानं माझी कर्जफेड झाली नाहीं, तर ती या संभावितपणाच्या साक्षींनं झाल्याचं मी मानून घ्यावं, म्हणून तुमच्या वडिलांनीं माझ्या हवालीं केली होती. आतां त्या संभावितपणाची हंडी फुटली. मग मी तरी या गळसरीच्या ऋणांत कशाला राहूं ?

घ्या ही. (उदाजीरावांच्या अंगावर टाकतात.) उदाजीराव, मला तुमच्या इभ्रतीची पारख झाली नाहीं खरीच-

**उदाजी** : (गळसरीकडे डोळे फाडून पाहात) पेटलेल्या चुडीवर पाणी ओतण्याचा डाव समजतो मला. संभावितपणाची हुंडी फुटलीच म्हणतां, तर ती या गळसरीनं थोडीच सांधणार आहे? (गळसरी तोडून मोरशेटांच्या अंगावर टाकून निघून जाण्याच्या झोकांत) गुणवतीच्या पायीं घराण्याची दौलत नि इभ्रत इरेला घालीन असं मी म्हणत होतों. तेव्हां वडिलांच्या हयातीकडे बोट दाखवून तुम्ही सबूरी करायला सांगितलं होतं. आठवतं कां?

**मोर०** : होय सांगितलं होतं. पण आतां तें कारण उरलं नाहीं.

**उदाजी** : (पाठ फिरवून तडक जिना सुधारीत) मग सबूरीचंही कारण उरलं नाहीं.

**मोर०** : (बैठकीवरून उठत) नाहीं. परिणामाला तयार असल्यावर बिलकूल नाहीं. (खिडकींतून रस्त्याकडे पाहत उभे राहतात. पाठीवर घेतलेल्या हातांतून तुटक्या गळसरींतला एकेक मोती ओघळून खालीं पडत आहे. खिडकींतून पाहतां पाहतां एक लांब उसासा टाकून मोठ्यानें हुंकार देतात आणि ओघळून पायाशीं लागलेल्या मोत्यांकडे पाहात, हातांत राहिलेल्या नुसत्या सूत्राकडे पाहून, रस्त्यावर शून्य दृष्टी लावीत) आतां सरदाराचं नांव इभ्रतदार नव्हे, बेजबाबदार!

[पडदा]

## प्रवेश दुसरा

[होना व बाळा विठाबाईबरोबर सासवडाला गेले होते. ते परत आले असून पुण्यांतील एका रस्त्यावर. घर नजीक येतांच बाळा तिकडे वळत होता, पण होना त्याची बाही धरतो]

**होना** : हं हं हं, अशी बगल देऊन चाललास कुठें?

**बाळा** : घरीं!

**होना** : ना बायको ना पोर! घर कसलं रे तुझं? चल आमच्या घरीं.

**बाळा** : आतां तुझ्या घरीं कशाला? सासवडला काय थोडा झाला पाहुणचार!

**होना** : अगदीं पोटभर कां! मग कां रे येत नव्हतास! आईच्या शब्दासाठीं अडला होतास वाटतं!

**बाळा** : अडलों नव्हतों रे. पण मोडवेना वडील माणसाचा शब्द ! होना, एका काळीं मला तुझ्या घरीं यायची चोरी झाली होती. आठवतं का ? मला पाहून पाप उभें राहिल्यासारखं तुझी आई डोळे मिटून घ्यायची. तीच आतां तुझ्या-माझ्यांत काडीचा दुजाभाव मानीत नाहीं. काय गंमत आहे ही.

**होना** : काळ पालटत असतो बाळा. हेंच पहा कीं जिथें तूं एकदां शेणमार खाऊन आलास, त्याच सासवडांतल्या लोकांनीं तुला डोक्यावर घेतलं कीं नाहीं ? अन् पुरंदऱ्यासारख्या सरदारांनीं तुला मानाचा विडा दिला कीं नाहीं ?

**बाळा** : ते होते गोरनर साहेबापुढें झालेल्या मजलसींत. श्रीमंतांच्या अमदानींत जसा बोलबाला झाला तसाच तो साहेबाच्या अमदानींतही होतो, हें त्यांनीं डोळ्यांनीं पाहिलं.

**होना** : हें मोरशेटांच्या अभिमानामुळं झालं.

**बाळा** : बाकी मोरशेट उगाच अभिमानाला पडले. आतां कांहीं आपली फड जिंकायची ईर्षा राहिली नाहीं.

**होना** : त्यांतून राघूसारख्या हलक्या तमासगिराविषयीं तर मुळींच नाहीं. पण आईनं फार हुशारीनं राह्यला सांगितलं आहे हं !

**बाळा** : तुला नुसतंच सांगितलं ! पण तुझी पाठ न सोडण्याचं वचन घेतलं आहे माझ्याकडून !

**होना** : नाहीं तरी सूर तिथें गळा अन् होना तिथें बाळा असं लोक म्हणतातच ना ! तें मी ऐकतों तेव्हां माझं मन कांसेखालच्या चरबीसारखं फेसाळतं बरं का !

**बाळा** : तुझं फेसाळतं रे ! पण घरीं तुझ्या बायकोचं अन् दारीं त्या गुणवंतीचं संध्याकाळच्या कमळासारखं मलूल होतं !

**होना** : कां रे ?

**बाळा** : अरे झडीच्या पावसागत कंटाळून जातात त्या आपल्या मैतरकीला.

**होना** : असं ? म्हणजे बघवत नाहीं त्यांना ?

**बाळा** : असा कसा रे तूं सोललेल्या केळ्यासारखा साळाभोळा ! एवढं कळेना तुला ? त्या म्हणत असतील,—कधीं एकांत स्वामिचा घडे !–म्हणजे तुझा ! कधीं

एकांत स्वामिचा घडे। मुखीं घालिन प्रीतीचे विडे। अन् या बाळाला दूर करून चार शब्द बोला गडे! तोंडावर हात फिरवून!

**होना** : असं म्हणतात? चल दे रुजुवात करून! खरं ठरलं तर—

**बाळा** : नको, नको. (हात जोडून) सांब-सदाशिवा, तेवढं करूं नको. दोन्ही ठिकाणची माझी पत फुकट घालविशील, अन् मला गूळ-पाण्याला महाग करशील.

**होना** : मग राहिलं. तूंच माघार घ्यायला लागलास तर मी तरी काय करणार? पण सांगू का एक? बायकांची मैतरकी खरी नव्हे, बाळा.

**बाळा** : कां रे?

**होना** : अरे, त्या ओढाळ पाण्यागत बरोबर ओढून नेतील. नाहीं तर थिरल्या पाण्यागत जागच्या जागीं कुजवून टाकतील माणसाला!

**बाळा** : ऑं? काय बोलतोस हें? अरे, सगुणेनं तुझ्या घराला तोरणमाळ लाविली. अन् गुणवतीनं तुझ्या गुणांची नक्षत्रमाळ उभी केली.

**होना** : हें खरोखरच माझ्या जन्मांतराचं पुण्य! सगळ्यांच्या वांट्याला येत नाहीं असं!

**बाळा** : सगळ्यांची कां फिकीर करतोस? तुझ्या पुरतं तूं बघ. दोघीही आपापल्या परीनं थोरच मिळाल्या तुला! एकीनं तुला जतविलं तर दुसरीनं तुला जोगविलं.

**होना** : खरं आहे तूं म्हणतोस तें!

**बाळा** : तमासगिरीच्या छंदानं मी तुला लावण्या करायला लावल्या, अन् त्या ऐकून हजारो लोकांनीं मानाही डोलविल्या. पण जीव असा तळहातावर काढून त्याच्याकडे पाहात राहावं ही करामत एकट्या गुणवतीनं करून दाखविली.

**होना** : काय काय, काय म्हणालास?

**बाळा** : तुझी ती भुपाळी! ती तमाशांत उपयोगी नाहीं म्हणून मी बाजूला सारली. पण तीच तुझ्याशीं एकदिल झाल्यामुळें गुणवतीनं श्रीमंतापुढें म्हणून दाखविली. तेव्हांपासून ती सर्वत्र दुमदुमते आहे. सासवडाला पुरंदऱ्यांच्या वाड्यांत तीच भूपाळी मी पहाटे म्हटलेली ऐकली. तेव्हां मला तुझी अन् गुणवतीची एकवट मूर्ती त्या भुपाळींत दिसूं लागली. वाटलं, अमृताची घागर डोक्यावर घेऊन सवाष्ण बाईच पुण्यक्षेत्रांतून चालली आहे. होना, त्या भुपाळीची सुरुवात

झाली कीं प्रसन्नतेच्या भारानं डोळे मिटतात अन् चित्ताच्या आकाशांत अरुणोदय झाल्याचं मनाला दिसूं लागतं. मनाच्या या हेलकाव्यांत भुपाळी ऐकतां ऐकतां अखेर—

**कोटि रवीहुनि तेज आगळें तुझिया वदनाला ।**
**होनाजी–बाळा नित्य ध्यातसे हृदयिं नाममाळा ॥**

या निशाणींत तुझ्या–माझ्या नांवांची सांगड घालून तूं मला कायमचं आभारांत ठेवलंस हें पाहून मी वेगळेपणानं उरतच नाहीं. पाण्यांत टाकलेल्या लवण-कळीप्रमाणं मी त्या भुपाळींत विरून जातों.

**होना** : अरे, मी काय तुला आभारांत ठेवलं! आपणां दोघांनाही आभारांत ठेवलं असेल तर तें श्रीमंतांनीं. आतां त्यांचं राहणं ब्रम्हावर्तोला. इथून पांचशें कोसांच्या तफावतीवर! पण तिथें सरस्वती बाईसाहेबांसमवेत श्रीमंत हीच भुपाळी नित्य नेमानं पहांटे म्हणत असतात, असं हरीपंत देशमुखांनीं मोरशेटांना सांगितलं. तें ऐकतांच त्यांच्या तोंडची भुपाळी मला इथें ऐकूं येऊं लागली. माझ्या डोळयांत पाणी उभं राहिलं. याच भुपाळीबद्दल श्रीमंतांनीं बहाल केलेली कंठी आज गुणवतीच्या गळयांत आहे. ती पाहून अजूनहि माझा उर भरून येतो. भूपाळी मी केली या अभिमानानं नव्हे, अगर ती गुणवतीनं गायिली याही अभिमानानं नव्हे. तर त्या भूपाळीचं कौतुक प्रथम श्रीमंतांनीं केलं या आठवणीनं! शृंगाराचे घडे इतरांसारखे श्रीमंतांनींहि लवंडले. त्यांत माझ्या लावण्या भिजल्या. पण त्याबरोबरच श्रीमंतांनीं गंगेचा कमंडलूहि हातीं धरला. त्यांत माझी भुपाळी भिजते आहे.

**बाळा** : तुझ्या लावण्या मी करवल्या. त्या जातील अगर रहातील. पण तुझी ही भूपाळी चंद्रसूर्याला साक्षीला ठेवून शुक्राच्या चांदणीसारखी अक्शीं–पहांटे अक्षय उगवत राहील. तूं कवनांच्या तंद्रींत असलास म्हणजे गुणवती तुझी शारदा होते, असं तूं म्हणतोस तेंच खरं आहे. त्याशिवाय कवनांची अशी उपज होणार नाहीं..

**होना** : त्यांतलं मर्म असं आहे बाळा, कीं त्या तंद्रींत गुणवती रूपसुंदर आहे हें मी विसरतों. हें विसरायला लावणं तिला साधतं, दुसरीला साधणार नाहीं.

**बाळा** : अन् तुम्हां दोघांची ही दाट सलगी विसरणं सगुणेला साधतं, दुसरीला साधणार नाहीं.

**होना** : होय बाळा. तिला सूर कळत नाहीं, शब्द समजत नाहीं. पण तिला एक सपूर ओळखतां येतं—माझं अंतरंग! खरंच, तुझ्यासारखा जिवाचा सौंगडी, सगुणेसारखी निर्मळ बायको अन् गुणवतीसारखी सांगातीण ही एकाच जन्मांत मिळणं केवढी मुश्कीलीची गोष्ट आहे. पण ती मला मिळाली. या माझ्या भाग्याला माझीच दृष्ट लागेल कीं काय असं मला कधीं कधीं वाटतं.

**बाळा** : थांब. आम्हां तिघांची सोय लावलीस. पण तुझी आई?

**होना** : आई? अरे, ती तुम्हां तिघांच्या माथ्यावर! शंकराच्या जटेंतल्या गंगेसारखी!

**बाळा** : वा होना! जागा तर छान शोधून काढलीस! ( होनाच्या खांद्यावर हात टाकून लांबवर नजर टाकीत ) कोण रे त्या? यमुनाबाई तर नव्हेत?

**होना** : ( निरखून ) यमुनाबाईच! रोजच्या पाहण्यांतलं माणूस ओळखेना तुला?

**बाळा** : रोजच्या पाहण्यांतलं तुझ्या, माझ्या नव्हे-पण कायरे? चालचर्या कांहीं रोजची दिसत नाहीं?

**होना** : हो, नाहीं खरीच! काय झालं बरं एकाएकीं! मोरशेटजींचा निकडीचा निरोप—

[ होना-बाळाला पाहून बुडत्याला आधार मिळाल्यासारख्या यमुनाबाई येऊन त्यांना बिलगतात. ]

**यमुना** : निरोपासरसे आलांत, बरं झालं! माझ्या जिवांत जीव आला.

**होना** : काय झालं हो?

**यमुना** : पुष्कळ झालं-थोडक्यांत इकडची पृथ्वी तिकडे झाली. इथें कसं सांगू तें सगळं!

**होना** : मग घरीं चला पाहूं.

**यमुना** : तुझ्या घरीं? नको-बायकोदेखत नकोत या गोष्टी!

**बाळा** : म्हणजे झालं तरी काय?

**होना** : गुणवती कुठें आहे?

**यमुना** : ( दोघांच्या चेहऱ्यांकडे आळीपाळीनें पहात पुटपुटत) गुणवती! ( मोठ्यानें ) गुणवती—( दुःखावेगानें डोळे मिटून मान खालीं घालीत ) गेली. धाड घालून नेली त्यानं.

**होना** : उदाजीरावानं ? ( यमुना होकार देते. तो पाहून दांत आवळून ) सांखळलेली मर्दुमकी गाजविली !

**बाळा** : तुम्ही कशी नेऊं दिलीत ?

**यमुना** : काय उलटी साल सोलतोस बाळा ? स्वतःची मुलगी डोळ्यांदेखत कोणी सुखासुखी नेऊं देईल कां ?

**होना** : ( बाळाचे शब्द लागलेले पाहून पाठीवर हात ठेवीत सांत्वनपूर्वक ) तसं नव्हे यमुनाबाई. त्यानं नेली कशी इतकंच बाळाचं विचारणं !

**यमुना** : नेली कशी ? घाला घालायच्या तयारीनंच आला होता तो, बरोबर चार घटिंगण घेऊन. त्यांना पाहतांच गुणवतीनं दहशत खाल्ली. दरवाजा बंद करून घेतला. तो त्यांनीं उखडून काढला. गुणवतीनं बळ बांधून प्रतिकार केला. ते काय तिला जुमानतात ! त्यांनीं तिला फरपटत बाहेर काढली. गाठोडं बांधून न्यावं तशी तिला उचलून नेली. नेतांना तिनं उदाजीला लाखोली वाहिली–( होनाजीस ) अन् तुझ्या नांवानं टाहो फोडला. काय सांगूं होना. तें ऐकून माझ्या काळजानं ठाव सोडला. तिचा तो आकांत ऐकवेना म्हणून मी कानावर हात ठेवले. तिचं केविलवाणं तोंड बघवेना म्हणून मी घट्ट डोळे मिटून घेतले. कसाबाच्या सुरीखालीं गाईनं मान टाकावी तसं झालं ! तिचं नि माझं !

**बाळा** : यमुनाबाई, असा प्रळय झाला असेल हें मला माहीत नव्हतं. आतां आम्हीं आलों आहों. आकाश-पाताळ धुंडून गुणवतीला तुमच्या ओट्यांत घालतों.

**यमुना** : घालाल रे तुम्हीं ! पण निर्वाणीचा क्षण ओळखून तिनं जिवाचं बरं–वाईट करून घेण्याची त्याला धमकी दिली. ती खरी ठरण्याची वेळ येण्यापूर्वींच काय करायचं तें करा.

**होना** : करतों, यमुनाबाई. प्राण गहाण ठेवून करतों. तुम्हीं निश्चिंत असा. चला घरीं. ( दोघे दोन बाजूला होऊन यमुनेला सांवरीत जातात. )

## प्रवेश तिसरा

[ होनाजीचें घर. आंतील सोपा. वेळ दिवेलावणीची असल्यामुळें लावलेला दिवा हातीं घेऊन तो मागील दारच्या वृंदावनापुढें दाखविल्यानंतर पुढील दारीं दाखविण्यासाठीं सगुणा आंतून येत आहे. तोंच बाहेरून " होनाजीराव " ही हांक ऐकून ती थबकते. आवाज ओळ-

खीचा पण अनपेक्षितपणें ऐकल्यानें तिला बुचकळा पडतो. तोंच दारांत पाऊल टाकून मारलेली दुसरी हांक येते. या हांकेंत आर्तता तर आहेच, पण कृतकृत्यताही आहे. सगुणेला आनंदाइतकेंच आश्चर्यही वाटतें.

गुणवती येते. तिची व सगुणेची दृष्टिभेट होते. गुणवतीला प्रत्यक्ष पाहतांच धक्का बसल्यासारखी सगुणा एक पाउल मागेंही घेते. तसें करतांना " न्हाई आल, सासवडास्नं." या पुटपुटलेल्या शब्दांत कंपही निर्माण होतो. सगुणेला पाहातांच गुणवतीला फार मोठा आधार मिळाल्यासारखं वाटून, ती " सगुणा " ही हांक जिव्हाळ्यानें मारून आईला मूल बिलगावें तशी सगुणेच्या गळां पडते. या धांदलींत सगुणेच्या हातांतील दिवा तर शांत होतोच. पण गुणवतीच्या बिलगण्यामुळें सगुणेचें अंग हिनकळतें. हातांतील निसटणारा दिवा ती कशीबशी सांवरते आणि गुणवतीला हलकेच दूर लोटीत म्हणते, ' अवोअवो दिवा— "

दोन पाउलें माघार घेऊन गुणवती शांत झालेल्या दिव्याकडे पाहते. विझालेल्या वातींतून धूर येत आहे. तो पहात असतां आपण आलों तो दरवाजा उघडाच असल्याचें लक्षांत येऊन ती चटकन् दरवाजा लावून घेते. दरजावर पाठ टेकून ती शांत झालेल्या दिव्याकडेच पहात आहे. ]

**गुणवती** : शांत झाला !

**सगुणा** : तो लावीन. पर तुमी कसं आला ?

**गुणवती** : ( दिव्याकडे पहात ) पळून आल्यें.

**सगुणा** : पळूनशेनी ? शामत हाये.

**गुणवती** : माझी कसली शाहमत, सगुणा. त्या मंदोदरीची, त्याच्या बायकोची.

**सगुणा** : तुमची आई घारीवानी घिरट्या घालती पगा. धा येळा येऊनशानी गेली असल.

**गुणवती** : होनाजीराव नाहीं आले ? ( सगुणा नकार देते ) कसे नाहीं आले ?

**सगुणा** : मानूस लावलाय म्हनं तुमच्या आईनं ?

**गुणवती** : होय ग. मला वाटलं, एव्हांना ते आले असतील.

[दारावर खुडबुड होते. दोघीहि तिकडे पहातात.]

**सगुणा** : आलं जनूं ! ( दाराकडे जाते.)

**गुणवती** : ( तिला आडवीत ) नव्हे सगुणा.

[ तोंच "कोण आहे आंत ! दरवाजा खोला" हे दरडावणीचे स्वर ऐकूं येतात.]

**गुणवती** : माझ्या मागावर आलेले लोक. सगुणा मला लपीव. लपीव मला कुठेंतरी. ( आणि ती सगुणेला बिलगते. तिला घेऊन लगबगीनें सगुणा आंत जाते. ती दिवा लावून आंतून येईपर्यंत आणखी एक-दोनदां धक्के व हांका ऐकूं येतात. दिवा घेऊन दरवाजाकडे जात—)

**सगुणा** : कोन ? दिवा लावीस्तवर फुरसत ह्यये का न्हाई ? ( दरवाजा उघडते. दोघे आंत येतात. त्यांच्याकडे रागानें पाहात ) कोन तुमी ? कुटनं आलां ?

**एक** : आम्ही ? आम्ही—

**दुसरा** : होनाजी कुठें आहे ?

**सगुणा** : ( तितक्याच ठांसीव स्वरांत ) न्हाइ आलं सासवडास्नं. कां ? ( दोघेही घोटाळतात. ) उंद्या या सकाळच्या पारी !

**एक** : गुणवती आली आहे का इथें ?

**सगुणा** : कोन गुनवती ?

**एक** : ती यमुनाबाईंची मुलगी ?

**दुसरा** : ( सगुणेला कांहींच बोध न झालेला पाहून ) यमुना कळावंतिणीची. माहीत असायला पाहिजे तुम्हांला.

**सगुणा** : न्हाई. ती कां म्हून येईल या घरांत ! बावनखनी काय वशाड पडली का ?

**दुसरा** : तसं नव्हे हो. स्नेहसंबंध आहे होनाजीचा.

**सगुणा** : असल. भाइरच्या गोष्टी भाइर.

**एक** : ती पळून आली आहे उदाजीरावांच्या घरांतून.

**दुसरा** : अन् ती आपल्या घरींही नाहीं.

**सगुणा** : म्हंजी ? अजब तरा दिसती तुमची ! कळवातनीच्या चौकशा गरतीच्या घरांत ? व्हा भाइर. ते आलं म्हंजी या.

[ बाळा येतो. त्या दोघां तिऱ्हाइतांकडे पाहतो. बाळा आला पण होनाजी त्याच्याबरोबर नाहीं हें पाहून सगुणा तशी चौकशी करणार तोंच या तिऱ्हाइतांपुढें हा प्रश्न विचारूं नये असें ती ठरविते. ]

**बाळा** : कोण ग हे सगुणा ? अन् अशा तिन्हीसांजीचे कां आले आहेत ? (त्यांनाच उद्देशून) घरांत कोणी नाहीं हें पाहून ?

**एक** : तसं नाहीं होनाजीराव !

**सगुणा** : (तोंडावर पदर घेऊन) अगबाया ?

**बाळा** : मी नव्हे होनाजीराव. तुम्ही कोण ? इथें कां आला ?

**दुसरा** : गुणवतीचा तलास करायला. उदाजीरावांच्या वतीनं आलों.

**बाळा** : भले ! उदाजीराव कोण, गुणवती कोण, अन् तिची चौकशी करतां कुठें !

**दुसरा** : ती त्यांच्या घरांतून पळून गेली आहे.

**बाळा** : कोण गुणवती ? अन् उदाजीरावांच्या घरांत कधींपासून राहात होती ?

**दोघेही** : रहात नव्हती-पण त्यांच्या घरांतून पळून गेली खरी.

**बाळा** : रहात नव्हती, पण पळून गेली ! आटलेल्या पाण्यांत बुडालेल्याची कहाणी सुनावता काय ? या उदाजीरावांनाच धाडून.

**एक** : उदाजीरावांना—

**दुसरा** : ते घरीं असते तर ती पळून कां जाती !

**बाळा** : मग म्हणणं काय तुमचं ?

**एक** : ती या घरांत आल्याचा वहीम आहे आम्हांला.

**दुसरा** : झाडा घेणार आम्ही.

**बाळा** : कोण समजतां तुम्हीं आपल्याला ? जप्तीचे कारकून कीं चपरासी ? नाहीं झाडा घेऊं देत.

**सगुणा** : ती हित कुटनं येईल आन् झाडा कशाचा घेता ?

**बाळा** : अन् आली असली आढ्याला भोक पाडून—

**सगुणा** : न्हाइ वो !

**बाळा** : तरी तुमची जबरदस्ती चालू देणार नाहीं मी !

**एक** : आमच्या नरड्याला फास लागला आतां !

**बाळा** : मग तो झाडा घेऊन सुटणार आहे काय ?

**दुसरा** : आमच्या पाहाऱ्यांतून गेली हो ती ! उदाजीराव फाडून खातील आतां ! काय करावं ?

**बाळा** : पळून गेली म्हणून सांगावं नी मोकळं व्हावं.

**दुसरा** : जीव गमावून ? आपण नाहीं सांगायला जात. तूं जा.

**एक** : मी काय म्हणून ? पाहाऱ्याची हमी तुझी.

**दुसरा** : पण गेल्याची वर्दी आणलीस तूं !

**बाळा** : तें बाहेर जाऊन ठरवा. इथें कां वर्दळ तुमची ?

[ दोघेही मागेपुढें पाहात जातात. बाळा दरवाजा लावून घेतो. ]

**सगुणा** : यकलच कसं आला वो ?

**बाळा** : एकटाच कसा येईन ? आलों दोघेही, गेलों तसे. वाटेंत यमुनाबाई भेटल्या. त्यांनीं उदाजीरावानं गुणवती नेल्याची अजब वार्ता सांगितली. त्यांना धीर देत त्यांच्या घरीं गेलों. तिथें गुणवतीनं धाडलेला माणूस आला. बाकी उदाजीरावाच्या कैचींतून सुटण्याची मोठीच शहामत लढविली हं तिनं ! ( दबलेल्या स्वरांत ) होनाजी गेला आहे. इतक्यांत घेऊन येईल तिला.

**सगुणा** : कुनाला ?

**बाळा** : ( तितक्याच दबलेल्या स्वरांत गुपित सांगावं तसं ) गुणवतीला !

**गुणवती** : ( आंतून येत ) बाळा ! ( आनंदानें हंसते. ) होनाजीराव-( बाळा स्तंभित होतो तें पाहून ) कुठें आहेत रे ?

**बाळा** : गुणवती ? तूं इथं ? ( कपाळावर हात ठेवीत ) मग- मग- ( हें म्हणतां म्हणतां तो दोन्ही हातांनीं डोकें धरून तें वर नेतो आणि तें खालीं आणून एक-वार गुणवतीकडे पाहून घट्ट डोळे मिटतो. पिळवटलेल्या स्वरानें विव्हळतो. ) अरेरेरे-

**सगु० / गुण०** : ( त्याच्या अंगविक्षेपाचा व उद्गाराचा यथार्थ न कळून ) काय झालं ?

**बाळा** : ( गुणवतीकडे तर्जनी उभारून रोखून पहात) तूं माणूस धाडला नाहींस ?

**गुणवती** : मी ?

**बाळा** : तुझ्या सुटकेसाठीं होनाजीला निकडीनं बोलावलं नाहींस ?

**गुणवती** : मी ?

**बाळा** : ( हताश होऊन ) नाहीं !

**गुणवती** : ( रडकुंडीस येऊन ) काय झालं रे बाळा ?

**सगुणा** : बाळाभाऊ—

**बाळा** : ( उलगडा झाल्यामुळें ) तरीच मला संशयाची घाण आली होती. पण तुझी आई उतावीळ, तितकाच होनाही. प्रसंगाची निकड ओळखून ओठावर आलेला नकार मी गिळून टाकला. चूक झाली.

**गुणवती** : कुठे गेले होनाजीराव ?

**सगुणा** : कुट गेलं वो ?

**बाळा** : ( दोघींच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करीत आपल्याच विचारधारेंत ) चूक झाली. अन् त्या नकाराबरोबर दैवानं मला अफू चारली. वैऱ्यानं दावेदारी साधली. ( निश्चयी स्वरानें ) ठीक आहे. गुणवती मी जातों. सगुणा, जातो हं.

**सगुणा** : कुटं जातां ?

**गुणवती** : कुठें निघालास बाळा ?

**बाळा** : तो असेल तिथें.

**गुणवती** : मी येतें.

**सगुणा** : अन् मीबी.

**बाळा** : कुठें येतां ? मीच त्याला घेऊन येतों. गुणवती, शर्थीनं बचावून आलीस, ती काय फिरून वाघाच्या दाढेखालीं जायला ? नको. सगुणा, गुणवती धाडसाचे पंख लावून आली नि तूं तिला चातुरीनें झांकून ठेवलंस. पण चेकाळलेला लांडगा पुनः केव्हां झडप घालील याचा नेम नाहीं. गहाळ राहूं नको नी तिला नजरेच्या ताटीबाहेर सोडूं नको.

**गुणवती** : ही माझी तरतूद झाली ! होनाजीरावांचं काय ?

**बाळा** : तुझ्या नांवानं कोणी तरी त्याची वाटचूक केली. तूं निसटून आलीस हें सांगून मी त्याला आणतों.

**गुणवती** : नेणत्याची समजूत काढतोस ? वाटचूक नव्हे, वाटमार आहे ती, बाळा. ती घडूं नये म्हणून मी पुनः धाडसाचे पंख लावून जातें. माझ्या जिवासाठीं धाडस केलं, तें काय मी त्यांच्यासाठीं करणार नाहीं ? माझा जीव खुशालींत राहावा म्हणून सगुणेच्या हवाली केलास. अन् त्यांचा आगीचा थारोळ्यांत होरपळत रहावा ? असलं खुशालीचं जिणं जगायचं नाहीं मला. घरांतून जबरदस्तीनं बाहेर काढतांना मी त्यांच्या नांवानं टाहो फोडला. तो घरांतच्या चार कोनांत जिरून गेला. आतां मी असा टाहो फोडीन कीं तो दाही दिशा भेदून जाईल अन् असतील नसतील तेथून होनाजीराव माझ्यासाठीं धांवत येतील.

**बाळा :** वेडी तर नाहींस तूं! बाहेर पडशील तर आल्हाद गिधाडाच्या बेचक्यांत सांपडशील. टाहो फोडण्यापूर्वीच तो तुझा गळा पिंजून टाकील. इतकंच नव्हे, तर तो होनाच्या जिवाशीं खेळ मांडील. तूं जाऊन काय मिळविणार? स्वतःचा जीव गोंवणार अन् होनाचाहि. तुलाच तेवढी होनाची पोटतिडीक आहे अन् मला काय नाहीं? या सगुणेला नाहीं? गुणवती, धाडसानं कमावलंस तें साहसानं गमावूं नकोस. थांब तूं इथेंच.

**गुणवती** : थांबूं? मी नाहीं थांबणार! होऊं दे माझं कांहींही. होनाजीरावांच्या सूर्यफुलापुढं माझी कोरांटी करपून जाऊं दे. मी थांबणार नाहीं.

**बाळा** : मी सांगतो म्हणून थांब. उंबऱ्याबाहेर पाऊल घालशील तर माझ्या गळ्याची शपथ आहे. माझ्या नी होनाच्या. माणसानं धीराचा अंत पाहूं नये. मी आणतों होनाला. माझ्या प्राणाच्या बदल्यांत आणतों. सगुणा सांभाळ तिला. (जातो)

**गुणवती** : (बाळा गेलेला पाहून धीर सुटल्यासारखी ती सगुणेच्या गळ्याला मिठी मारते) सगुणा! (वर मान करून तिच्या तोंडावरून हात फिरवीत) सगुणा, रहावत नाहीं मला. माझ्यासाठीं तुझं——

**सगुणा** : (तिच्या तोंडावर हात ठेऊन) बोलूं नका असं. अन् जाता कुटं? त्या उंबऱ्यावर बाळाभाऊंनीं गळा ठिवलाय आपला. आन् त्येंचा. वलांडून न्हाई जायाचं.

**गुणवती** (आवेगानें पुन्हां तिला मिठी मारून व तिच्या छातींत तोंड खुपसून आंतडें पिळवटून हांक देते) होनाजीराव! (आणि त्या हाकेंतच जीव ओतून संपल्यामुळें निर्जीव झाल्यासारखी तिच्या कवेंतून कोसळते.)

[पडदा]

## प्रवेश चौथा

[होनाजी व निरोप्या म्हणून होनाजीस घेऊन आलेला उदाजीचा हस्तक बच्चाजी, वानवडीच्या रानांत.]

**होना** : (चौफेर नजर फिरवीत) घाशीरामाच्या तळ्यानजीक म्हणतां म्हणतां वानवडीचं रान आलं कीं हो?

**बच्चाजी** : येई ना! तुम्हाला गुणवतीची गांठ घालून दिल्याशीं कारण.

**होना** : या रानांत कशी येणार ती ?

**बच्चाजी** : न यायला काय झालं ? गुप्त ठिकाणं गजबजींत कां असतात ? आडरानांतच असायचीं.

**होना** : अन् अशा अपरात्रीं ?

**बच्चाजी** : जरा उसंत खाल कीं नाहीं ? भुकेल्याचा भात शिजत नाहीं म्हणतात. तशागत झालंय तुमचं ! तिच्यावर इतका जीव आहे कां हो तुमचा ?

**होना** : हें विचारण्याइतकी सलगी आहे कां तुमची—माझी ?

**बच्चाजी** : ( या प्रश्नाकडे दुर्लक्ष करीत ) उदाजीरावांनीं आणल्यापासून तिनं तुमच्या नांवाचा सारखा जप चालविला होता पाहा. जशी कांहीं अशोक वनांतली सीताच. तुमच्यावर फार जीव दिसला तिचा. तुमची गांठ घालून दिल्यावर मागेन ती बक्षिसी मला मिळणार आहे, यावरूनच मी समजलों.

**होना** : हें तुमचं बोलणं देखील सलगीविरहित आहे. निरोप्यानं निरोप पोंचवावा, अवांतर चौकशा करूं नयेत.

**बच्चाजी** : बरं राहिलं.

**होना** : उदाजीरावांनीं गुणवतीवर पहारा करण्याचं काम तुमच्यावर सोंपविलं म्हणतां, तेव्हां त्यांचे फार विश्वासूक दिसतां.

**बच्चाजी** : दिसायचं काय, आहेच. पूर्वीं मी त्यांच्या पथकांत बारगिरी केली आहे ना ? ते धनी नी मी चाकर. त्याखेरीज इतकी जोखीम कोणी अंगावर टाकील कां ?

**होना** : तरीच ! गुणवतीनं बक्षिसाची लालूच दाखवितांच विश्वासाच्या धन्याचा घात करायला उठला बरं कां !

**बच्चाजी** : एकाचा घात होतो, तेव्हां दुसऱ्याचं हित होत असतं होनाजीराव. आतां उदाजीरावांचा घात होणार असला तरी तुमचं हित नाहीं कां होणार ? तुमचं नी गुणवतीचं ?

**होना** : तुम्ही चाकर त्यांचे, आमचे नव्हत. आमच्या हिताहून त्यांच्या घाताची फिकीर हवी तुम्हांला ! क्षुल्लक बक्षिसासाठीं धन्यावर उलटतां ?

**बच्चाजी** : तुमच्यासाठीं होनाजीराव, अन् तुमच्या गुणवतीसाठीं. तुम्ही दोघे राघू-मैनेसारखे परस्परांवर जडून असतांना उदाजीरावांनीं तिला काढून नेण्याची कुचाळी करावी, अन् तें देखील तुम्ही सासवडाला गेल्याचं पाहून. हें मुळांतच गैर नव्हे कां ?

**होना** : मग ही गैरशिस्त रोजगारी तुम्ही पत्करायची नव्हे.

**बच्चाजी** : तुम्ही म्हणतां तें रास्त आहे. तसंच करायला हवं होतं. पण रास्तीच्या वाटेनं पैसा मिळावा तितका मिळत नाहीं, होनाजीराव. आतां हेंच पाहा, या कामगिरीबद्दल उदाजीरावांकडून मिळालं त्याहून गुणवतीकडून खात्रीनें अधिक मिळेल.

**होना** : म्हणजे दुहेरी बक्षिसाचा बेत दिसतोय तुमचा.

**बच्चाजी** : बरोबर ओळखलंत. शिवाय मागितली तर तुमच्याकडून मिळेल ती वेगळीच. पण मी तुमच्यापाशीं मागणार नाहीं. दिलीत तरी घेणार नाहीं.

**होना** : कां हो ?

**बच्चाजी** : तुम्ही नामचंद शाहीर आहां, हें मी जाणतों. तुमच्या शाहीरीवर मी अनिवार जडलों आहे.

**होना** : मग तुम्ही कांहीं नुसत्या निरोपाचे धनी दिसत नाहीं.

**बच्चाजी** : कशावरून हो ?

**होना** : अवांतर बरीच माहिती दिसते तुम्हांला. अन् कांहीं धोरणहि दिसतंय त्यांत. नाहीं तर गुणवतीची गांठ घालून बक्षिसी पदरांत पाडून घेण्याऐवजीं भाकड गोष्टींत वेळ काढीत राहिला नसतां. आतां तुमचा निरोपहि भाकड दिसतोय मला.

**बच्चाजी** : म्हणजे माझा संशय आला, असं कां म्हणत नाहीं ?

**होना** : तो आलाच होता तुम्ही निरोप आणला तेव्हां. अन् आतां तुमची टाळाटाळ पाहून–( घोडे खिंकाळतें, तिकडे पहातो.)

**बच्चाजी** : तो पक्का झाला असंच कीं नाहीं ? होनाजीराव, माणसाची बुद्धी ऐन वेळीं दगा देत असते. तसं झालं तुमचं.

**होना** : ही तुमची कानगोष्ट ऐकायला आलों नाहीं मी !

**बच्चाजी** : नाहीं. तुम्ही आला गुणवतीसाठीं.

**होना** : कुठें आहे ती ?

**बच्चाजी** : हें सांगण्याठीं तुम्हांला इथें आणलं नाहीं मी !

**होना** : वाटलंच मला. मग ही वाटमारी कुणाच्या मसलतीनं केलीत ? कुणासाठीं थांबलांत ?

**उदाजी** : ( मागून येऊन ) सांगतों कुणासाठीं तें.

**होना** : कोण उदाजीराव ?

**उदाजी** : ( होनाच्या म्हणण्यास मान तुकवीत बच्चाजीस ) बच्चाजी, घोडं सांभाळून उभा राहा त्या झाडाखालीं. कोणाला फिरकूं देऊं नको. ( होनास ) पटते कां ओळख ?

**होना** : कां? मी रातांधळा नाहीं! अपरात्र झाली नि आडरानीं आलों तरी मी माणूस नीट ओळखतों.

**उदाजी** : शाहिरीच्या घमेंडींत बोलूं नको. माणसाचा राक्षस होत असतो आडरानांत.

**होना** : राक्षस मूळचाच असावा लागतो. होऊं म्हटल्यानं होत नाहीं.

**उदाजी** : तुला इथें कां आणलं हें न कळण्याइतका नेणता आहेस तूं?

**होना** : इकडे येण्यासाठीं पाऊल उचलीपर्यंत नेणता होतों. त्यानंतरची पायपीट जाणतेपणानंच झाली आहे.

**उदाजी** : तुझं मरण तुझ्या शाहिरीनं अन् गुणवतीनं ओढवलं आहे हें माहीत आहे कां तुला?

**होना** : माहीत आहे, पण त्याचं दुःख मला नाहीं. कारण त्या दोघींनींच मला जगविलं होतं. त्यांना मी नकोसा झालों असेन तर जगून तरी काय करायचं?

**उदाजी** : तुझी शाहिरी तुझ्याजवळ असेल. पण गुणवती माझ्या ताब्यांत आहे.

**होना** : शाहिरी नी गुणवती मी दोन मानीत नाहीं. शाहिरी माझ्याजवळ आहे, तशीच गुणवतीही माझी माझ्याजवळच आहे. तुमच्या ताब्यांतली गुणवती माझी नव्हे. माझी गुणवती शाहिरीसारखीच कोणाची ताबेदारी मानणारी नाहीं.

**उदाजी** : मरणाला रात्र आडवी करूं पाहतोस काय?

**होना** : ती कां? रोख मरणाला केव्हांही तयार असण्याची शिपाइगिरी माझ्यांतही आहे. शाहिरीचं डफ हातांत धरलं तरी मी शिपाईगिरीची बाणी सोडलेली नाहीं. कोण मारणार आहे मला?

**उदाजी** : मी—

**होना** : तुम्ही? तुम्ही मारणार आहां मला?

**उदाजी** : म्यानांतून समशेर निघेपर्यंत खरं वाटणार नाहीं तुला.

**होनाजी** : ( उदाजीनें म्यानाबाहेर काढलेल्या समशेरीकडे पाहात ) अन् निघालेली पाहून तरी खरं कसं वाटेल? कारण ती समशेर मी ओळखतों. ती सूर्यनारायणासमक्ष नागवी व्हायला लाजणार नाहीं. अपरात्रीच्या काळतोंडापुढें खात्रीनं लाजेल. ती समशेर परजणारा शिपाई उघड्या रणमैदानांत मुंडक्यांचा खच पाडील, आडरानांत मारेकऱ्याचं काम करणार नाहीं. उदाजीराव, उलट्या मलईच्या लालचीनं इंग्रजांशीं मिलाफी होऊन कैकांनीं मात्रागमनीपणा केला. तुम्हीं मात्र नेकजातपणानं श्रीमंतांशीं रुजू राहून दौलत गमावून बसलां,

हें मी डोळ्यांनीं पाहिलं अन् त्यावर पवाडा रचला. श्रीमंतांचं चौकड्याचं राज्य गेलं तरी तुमच्यासारखा एखादा ओघळून राहिलेला मोती माझ्या शाहिरीला तेज चढवायला पुरेसा आहे. ( होनाच्या शब्दांचा परिणाम म्हणूनच कीं काय उदाजी समशेर म्यान करतो. ) उदाजीराव, माझ्या मागें तो मोती असाच सुढाळ राहील तर माझ्या पाठचे शाहीर त्या तेजाच्या पाणपोयीवर चुळक्या–चुळक्यानं पाणी पिऊन तुस्त होतील. मग तुम्ही कशासाठीं हा मारण्याचा कमअस्सलपणा पत्करतां? तुमच्या समशेरीचं कागदी पातळ फेडून तिला काळ्या सुडक्यानं कां मढवितां ? मोलानं मारेकऱ्याचा धंदा करणारे खंडोगणती लोक श्रीमंताच्या अमदानींत आर्डी–दर्डी वावरत होते. तेच आतां कंपनी सरकारच्या अमलांत उमरावी समले सोडून मिरवताहेत. बोलवा त्यापैकी कोणाला तरी !

**उदाजी** : ( बच्चाजी येतो त्याच्याकडे वळून ) कां आलास रे ?

**बच्चाजी** : राघू आला आहे.

**उदाजी** : राघू ?

**होना** : सांगोल्याचा राघू ? ( या प्रश्नाला आंतूनच प्रत्युत्तर– "व्हय सांगोल्याचा. राम राम व्हनाजीराव !" त्याच्याकडे पहात आणि त्याला उद्देशून ) राम राम राघू ! माझ्या शाहिरीनं तुला नाडलं म्हणून फार दिवसांचा राग धरून आहेस. माहित आहे मला. कवनांच्या बिकट चालींत वेंचक शब्दांची ओवण करून शाहिरीची तोरणमाळ बांधण्याचं काम तुला कधींच साधलं नाहीं. आतां खांड-गळ्या शिव्यांची लाखोली वाहून शाहिरीच्या अंगावर हात टाकणं तुला साधायला कांहींच हरकत नाहीं. ती तुझ्या रोजच्या व्यवहारांतली गोष्ट आहे. ( उदाजीस ) बोलवा त्याला उदाजीराव. तुमचं काम तो इमानानं करील. अन् तुम्ही इथून जा. पतिव्रतेनं शिंदळकी पाहूं नये.

**राघू** : ( आंतूनच ) व्हनाजीराव ?

**उदाजी** : ( त्याच्याकडे पाहात जरबेनें ) राघू ! बच्चाजी, जा म्हणावं त्याला.

**बच्चाजी** : तयारीनं आलों म्हणतो आहे.

**उदाजी** : ऐकूं आलं नाहीं कां सांगितलं तें ? जा म्हणावं. नाहीं तर गस्तीचा राऊत बोलावून कोतवाली दाखवीन. ( तरी देखील बच्चाजी होनाजीकडे पाहात उभा राहतो. ) बच्चाजी– ( बच्चाजी जातो. )

**होना** : ( झालेल्या प्रकाराचा थांग लावीत ) बेत फिरविलात ? ( उदाजी होकार देतो ) कां ?

**उदाजी** : माझ्या आडोशानं त्यानं आपलं वैर उगवून घेणं, मला मंजूर नाहीं.

**होना** : पण तो आला होता तुमच्या मंजुरीनंच.

**उदाजी** : गुणवती माझ्या ताब्यांत नव्हती तेव्हांच्या मसलतीनं. माझा दावा गुणवतीबद्दल, तुझ्या शाहिरीबद्दल नाहीं.

**होना** : मग हें जीवदान म्हणजे तुमच्या शिपाईगिरीनं माझ्या शाहिरीवर चढविलेलं लेणंच, असं मी मानतों.

**उदाजी** : जीवदान, पण गुणवतीवांचून ! तूं आणखी कोणाची हयात उसनी घेऊन शाहिरी करीत राहिलास, तरी माझी हरकत नाहीं.

**होना** : इतका वेध तुम्हांला गुणवतीचा ?

**उदाजी** : होय. मोरशेटजींबरोबर तिला प्रथम पाहिली तेव्हांपासून माझ्या चित्तावर उमटलेला ठसा पुसून टाकणारी दुसरी कोणी अद्याप मला भेटली नाहीं.

[ घोडें खिंकाळतें. उदाजी व होनाजी तिकडे पाहूं लागतात. तोंच होनाजीच्या घरीं गुणवतीच्या शोधार्थ आलेल्यांपैकीं एक गर्भगळित होऊन धापा टाकीत येतो. ]

**उदाजी** : तूं कां आलास पहारा सोडून ?

**पाहरेकरी** : गुणवती गेली.

**उदाजी** : ( वीज कडाडल्यासारखा ) काय ?

**पहारेकरी** : ( गयावया करीत ) पळून गेली पाहऱ्यांतून.

**उदाजी** : ( अंगांत राक्षसी संचार झाल्यासारखा भडकून तलवार बाहेर काढून पहारेकऱ्याच्या अंगावर जातो ) पळून गेली पहाऱ्यांतून ?

**होना** : ( त्या शब्दांनीं गुणवती जणूं आपल्यासमोर पाहात असल्याप्रमाणें ) गुणवती पळून गेली पाहऱ्यांतून.

**उदाजी** : ( होनाचे हे शब्द ऐकतांच चवताळून मोहरा फिरवून त्याच्यावर हत्यार चालवितो. होना खालीं कोसळतो. त्याच्याकडे पाहात ) पळून जाते काय ? ( तडक पाय काढीत ) बच्चाजी, घोडं ! ( जातो. भयभीत झालेला पहारेकरीही मागोमाग जातो. )

[क्षणभर रंगभूमीवर सामसूम. होनाजी कण्हत कुशीवर वळतो. "गुणवती गेली! बाळा!" इतक्यांत बाळाची लांबून हांक ऐकूं येते, "होना–" आणि तो पाठोपाठ धांवत येतो.]

**होना** : बाळा आलास तूं?

**बाळा** : (त्याचा शब्द ऐकतांच झड घालून त्याला मिठी मारतो. सांवरून त्याला बसवीत) आलों रे! काकडारतीच्या भेटीची शेजारती करायला! होना, गुणवती आली.

**होना** : इथें?

**बाळा** : नाहीं. घरीं! तुझ्या!

**होना** : सांभाळ तिला अन् सगुणेला.

**बाळा** : (मोठ्यानें हुंदका देऊन) अन् मला कोण संभाळील आतां! होना, काय पाहाण्याचं नशीबीं आलं माझ्या! त्या दोघी तुझी वाट पाहत तेवणाऱ्या समईसारख्या घरीं खोळंबल्या आहेत रे! तुला घेऊन येतों असं मी त्यांना सांगून आलों. प्राणाच्या बदल्यांत आणतों अशी भीक देऊन आलों. आतां तुझ्यावांचून मी कसा जाऊं? काय सांगूं त्यांना? माझ्या पोटांत दुःख शिरलं, तें काढून अमृत कोण घालील तुझ्यावांचून. आतां तुझ्या स्मरणाचे लक्षावधि मणी ओढून हयातभर झिजविले तरी तूं साद देणार नाहींस. होना, तुझा सूर तूं घेऊन घेलास अन् माझा गळा उघडा टाकलास

[भुपाळींचे अस्पष्ट सूर ऐकूं येतात.]

**होना** : सूर? मी नाहीं नेला.

**बाळा** : (उत्कंठेनें) काय म्हणालास?

**होना** : (स्पष्ट होत जाणाऱ्या सुरांकडे बोट दाखवीत) ऐक—

**बाळा** : (भुपाळीकडे दुर्लक्ष करीत) थांबलास कां? बोल. आणखी चार शब्द बोल रे. (होना मानेनें नकार देत त्याला भुपाळीचे सूर ऐकण्यासाठीं पूर्ववत् बोट दाखवितो) नाहीं? मग न बोलणं हेंच आतां तुझ्याशीं बोलणं? अन् हे सूर हेंच तुझं देणं?

[भुपाळी खड्या सुरांत ऐकूं येते. ती ऐकत असतां मांडीवर डोकें घेतलेल्या होनाकडे पहात बाळा स्तब्ध होतो आणि त्या सुरांच्या लयांत होनाच्या छातीवर डोकें टेकतो.) [पडदा]

★ ★ ★